# हिटलर

01048



लेखक व प्रकाशक,

महादेव पांडुरंग नेने,

बी. ए., एल्‌एल्. बी.

किंमत बारा आणे

७१०५४

## वाचनीय पुस्तकें

1. Hitler ( Bilddokumente der Zeit )
2. Hitler by Lengyel
3. Hitler by Wyndham Lewis
4. Hitlerism by Nordicus
5. I saw Hitler by Dorothy Thompson
6. Germany--Fascist or Soviet ?
7. Modern Germanies by C. Hamilton
8. Germany and the Germans by Diesel
9. Herder and the Foundations of German Nationalism.
10. Germany by Gooch
11. Germany under the Treaty by Dawson
12. The German Revolution by J. King
13. The Crisis of German Democracy
14. The Germans by Shuster
15. Thoughts on Germany by Kuhlmann
16. Is Germany Finished ? by P. Vienot
17. Germany by Bithell
18. The Brown Book of the Hitler Terror
19. Germany Puts the Clock Back by Mowrer

मुद्रक,
आत्माराम प्रिंटिंग प्रेस,
खारीबाव रोड, बडोदें.

# प्रस्तावना

जर्मनीचे सध्यांचे सर्वाधिकारी हर हिटलर यांचें हें चरित्र येथील 'कप्तान' साप्ताहिकांत क्रमशः प्रसिद्ध झालें होतें. तेंच या छोट्या पुस्तकांत पुनर्मुद्रित केलें आहे.

२ स्वतंत्र ग्रंथलेखनास जें चिंतन व मनन लागतें तें वर्तमानपत्री लिखाणास लागत नाहीं. यामुळें, टीकाकारांच्या दृष्टीनें हें चरित्र 'चरित्राच्या चौकटीत' न बसल्यास त्याचें लेखकास आश्चर्य वाटणार नाहीं.

३ हिटलर व त्याचा नाझी संप्रदाय यांची मराठी वाचकास तोंड--ओळख करून देण्यासाठीं या चरित्राचा अवतार आहे. लेखकाचा हा हेतु सफल झाला असल्यास आपल्या श्रमाचें सार्थक झाल्याबद्दल त्यास आनंद होईल.

४ जर्मनीची राजकीय स्थिति हरघडीस पालटत असून आपली सत्ता स्थिरावण्यासाठीं हिटलर दररोज नवीन उपाय योजत आहे. त्यानें घडवून आणलेली राजकीय क्रांति एका दृष्टीनें अभूतपूर्व असून जर्मनीच्या भवितव्याकडे सर्व जगाचे– विशेषतः युरोपांतील कांहीं राष्ट्रांचे –डोळे लागून राहिले आहेत. या क्रांतीची व आधुनिक जर्मनीची ज्यास अधिक माहिती हवी असेल त्यांनीं अन्यत्र दिलेल्या यादींतील पुस्तकें जरूर वाचावीत.

५ हें चरित्र पुनर्मुद्रित करण्याचें कामीं कप्तानचे संपादक रा. वसंत बळवंत कप्तान यांनीं मला फार मदत केली, तीबद्दल त्यांचा मी ऋणी आहे.

लोकशिक्षणग्रंथावली,<br>
बडोदें, ता. ५ ऑगस्ट १९३३<br>
नारळी पौर्णिमा शके १८५५

म. पां. नेने

# अनुक्रमणिका





# हिटलर

## प्रकरण पहिलें.

### पहिलीं तीस वर्षें.

ई. स. १९२८–२९ पासून आपल्याला हिटलरचें नांव ऐकूं येऊं लागलें. त्या वेळेपासून आजपर्यंत मधून मधून त्याचें नांव आपण ऐकतच आहोंत व अलीकडे ( १९३२–३३ ) त्याचें आणि त्याच्या नाझी पक्षाचें नांव बहुधा रोज आपल्या कर्णपथावर येत आहे.

हिटलरचें घराणें मूळचें ब्राउनाउ ( Braunau ) गांवचें राहणारें, पण हिटलरचे वडील कस्टम्स खात्यांतील नोकरीमुळें लाम्बाख ( Lambach ) गांवीं राहात असत. ब्राउनाउ व लाम्बाख हीं दोन्ही गांवें ऑस्ट्रियाच्या सरहद्दीवर आहेत.

हिटलरचा जन्म आपल्या मूळच्या गांवींच म्हणजे ब्राउनाउ येथें ता. २० एप्रिल १८८९ रोजीं झाला. हिटलरचे वडील ऑस्ट्रियन, आई बोहेमिअन व त्याचा स्वतःचा जन्म ऑस्ट्रियांत झाल्यानें तो मूळचा जर्मन नागरिक नाहीं. ह्या बाबतींत त्याचें नेपोलिअनशीं थोड्या प्रमाणांत साम्य आहे. नेपोलिअनचा जन्म कॉर्सिका बेटांत झाला. हें बेट मूळचें फ्रेंचांचें नाहीं, पण नेपोलिअनच्या जन्मापूर्वींच कांहीं दिवस तें फ्रेंचांनीं सर केलें होतें. नेपोलिअन फ्रेंच प्रजाजन बनला हा केवळ कालाकालीगन्याय आहे. मूळ शोधूं गेलें तर नेपोलिअन जसा फ्रेंचांना परकीय

होता, तसा हिटलरही जर्मनांना परकीय आहे. हिटलर जर्मन नसल्यामुळें त्याला राज्यकारभारांत अध्यक्ष अगर चॅन्सेलर होऊन हात घालतां येण्यासारखा नव्हता; त्याच्या वाटेंतील ही अडचण एका युनिव्हर्सिटीनें त्याला अर्थशास्त्राचा प्रोफेसर नेमून दूर केली.

हिटलर बारा वर्षांचा झाला तेव्हां त्याच्या वडिलांनीं त्याला शाळेंत घातलें. हिटलर ऑस्ट्रियांत सरकारी अधिकारी व्हावा ह्या पलीकडे त्याच्या वडिलांची महत्त्वाकांक्षा नव्हती. ब्राउनाउ गांव लहान असल्यानें हिटरला शिक्षणासाठीं लिंझगांवीं पाठविण्यांत आलें. उत्तर आस्ट्रियांत लिंझ हें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. लाम्बाखचे शेतकरी दर बुधवारीं तेथें जात व आपला माल बाजारांत विकून, संध्याकाळीं मौज मजा करून आपल्या गांवीं परतत.

लिंझ हिटरला फार आवडलें. सुरवातीला तेथील आनंदी आणि चैनी वातावरण पाहून 'वेळच्या वेळीं व्यवस्थित खायला प्यायला मिळालें आणि थिएटर अगर गुत्त्यावर कामधाम मिळालें म्हणजे आयुष्याची इति कर्तव्यता झाली,' असें त्याला वाटूं लागलें. त्याच दिवसांत थोडे पैसे जमवून त्यानें नाटक पाहिलें. नाटक विल्यम टेल संबंधीं होतें. हिटरला स्वतःला ह्या नाटकांतील नारिंग, जुलमी राजा आणि एक मनुष्य या पलीकडे कांहीं आठवत नाहीं, पण ह्या नाटकाचा त्याच्या मनावर पुष्कळ परिणाम झाला असावा.

शाळेंतील अभ्यासाकडे हिटलर लक्ष देत नसे. त्यामुळें मास्तरांचेंही त्याच्याकडे लक्ष नव्हतें. लिंझ गांवच्या आसपासच्या पर्वतराजींतून हिंडावें व ऐतिहासिक पुस्तकें वाचावीं हाच काय तो त्याचा कार्यक्रम. इतिहास वाचत असतांना सुद्धां कांहीं प्रकरणें तो आवडीनें व आनंदानें वाचत असे. विशेषतः शार्लमान, ज्युलिअस सीझर व अलेक्झांडर दि ग्रेट यांविषयींचा मजकुर तो पुनः पुनः वाची.

हिटलरला आपलें शिक्षण लवकरच संपवावें लागलें. त्याच्या वयाच्या तेराव्या वर्षींच त्याचे वडील वारले. पुढें तीन वर्षांनीं त्याची आईही दिवंगत झाली.

मातेचें छत्र हरपण्यासारखें दुसरें दुःखच नाहीं. वयाच्या सोळाव्या वर्षीं हिटलर-वरील मातृप्रेमाची पांखर नाहींशी झाली. हिटलर पोरका झाला !

आईबापांच्या निधनानंतर हिटलरला लाम्बाख गांवीं राहणें शक्य नव्हतें. होती नव्हती ती शेतजमीन अन्त्येष्टिविधीला लागणाऱ्या खर्चाची तरतूद करण्यासाठीं त्याला विकावी लागली. लाम्बाख खेडें असल्यानें मोलमजुरी करून पोट भरणें शक्य नव्हतें. म्हणून त्यानें व्हिएन्नाचा मार्ग धरला. व्हिएन्ना स्टेशनवर हिटलर उतरला त्यावेळीं त्याच्या खिशांत अवघे पन्नास फ्लॉरिन शिल्लक होते.

व्हिएन्ना ही ऑस्ट्रियाची राजधानी आहे. व्हिएन्नास पोंचल्यावर हिटलरनें प्रथम तेथील आर्ट अकॅडमींत प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न केला, पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. शेवटीं पोटासाठीं त्याला पडेल तें काम पत्करावें लागलें. त्यानें कधीं गंवड्याच्या हाताखालीं पाट्या वहाव्या तर कधीं सुताराच्या हाताखालीं रंधा मारावा. अशा परिस्थितींत त्याला स्वतंत्र खोली भाड्यानें ठेवण्याइतका पैसा कसा मिळावा ? त्याला खोली ऐवजीं एक अंथरुणच भाड्यानें ठेवावें लागलें व वाचनासाठीं गॅसबत्ती ऐवजी मेणबत्तीच त्यानें पसंत केली. आंथरूण भाड्यानें ठेवलें तें सुद्धा सर्व रात्र-भर त्याला मिळत नसे. आंथरूण त्याचयाकडे कांहीं तासच भाड्यानें असे. पुढें पुढें त्याला बरें दिवस दिसूं लागले व स्वतंत्र खोली भाड्यानें ठेवण्याइतका पैसा त्याला मिळूं लागला. त्यानें पुढें इमारतींचे नकाशे काढून देण्याचा धंदा सुरू केला. त्यावेळीं मात्र त्याची प्राप्ती बऱ्यापैकीं होती, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

सन १९१२ मध्यें हिटलरनें ऑस्ट्रिया सोडला व बव्हेरिआची राजधानी म्यूनीक गांठली. त्याला ऑस्ट्रियांत राहणें कधींच आवडलें नाहीं. तो स्वतःला जर्मन म्हणवून घेत असे व ऑस्ट्रियन राष्ट्रगीत म्हणण्यापेक्षां जर्मन राष्ट्रगीत गाण्यांतच त्याला विशेष आनंद वाटे.

म्यूनीकला आल्यावर लवकरच युरोपिअन महायुद्धास तोंड लागलें. हिटलरनें बव्हेरिअन सैन्यांत प्रवेश मिळण्यासाठीं अर्ज केला व तो मंजूर झाला.

सैन्यांत दाखल झाल्यावर हिटलरला युद्धांत अघाडीवर जाण्याची उत्कंठा लागली, पण त्याचें लष्करीशिक्षण पुरेसें झालें नसल्यानें त्याला अघाडीवर धाडण्यांत आलें नाहीं. कांहीं दिवसांनीं त्याची मनीषा पूर्ण झाली. येप्रस ( Ypres ) येथील पहिल्या लढाईत त्यानें शत्रुपक्षांतील सैनिकांना यथाशक्ति कापून काढलें. सन १९१७ च्या शेवटपर्यंत जर्मन सैन्याचीच सर्वत्र सरशी होती. ल सार ( Le Sares ) येथील लढाईत हिटलर जखमी झाला व त्याला एका बर्लिन हॉस्पिटलमध्यें उपचारासाठीं पाठविण्यांत आलें. सन १९१७ च्या वसंतांत तो पुनः कामावर रुजू झाला, पण त्याला अघाडीवर जाऊन वर्ष सवावर्ष होत आहे तोंच कायमचें परत यावें लागलें. सन १९१८ मधील ऑक्टोबर १३ ला कोमिन ( Comines ) येथें घनघोर युद्ध झालें. त्यांत इंग्रजी सैन्यानें विषारी धुराचा मारा केल्यामुळें जर्मन सैन्याची त्रेधा उडाली. हिटलर तर आंधळाच झाला. जीवितासाठीं पाय नेतील तिकडे तो पळत सुटला. शेवटीं सुश्रूषा पथकांतील लोकांनीं त्याला उचलून फील्ड हॉस्पिटलमध्यें नेलें. पुढें त्याला पोमेरिआंतील पासेवांक ( Pasewalk ) गांवीं ठेवण्यांत आलें. युद्ध समाप्तिपर्यंत तो तेथील एका रुग्णालयांतच पडून होता.

येथवर हिटलरच्या आयुष्याची उणी पुरी तीस वर्षे संपलीं. ह्या तीस वर्षांत जनतेच्या डोळ्यांत भरेल अशी भरीव कामगिरी हिटलरच्या हातून झाली नाहीं. ह्याला कारण त्याचें झालेलें थोडेसें शिक्षण व परिस्थिति याशिवाय काय असणार? युद्धाच्या काळांत साध्या शिपायाला जेवढें करणें शक्य होतें तेवढें त्यानें केलें. त्याबद्दल अत्यंत बहादूर शिपायास देण्यांत येणारा पहिल्यावर्गाचा लोखंडी क्रॉस त्यास मिळाला होता. हिटलरचा दर्जा सुरवातीस एक साधा पाइक व पुढें लान्स कॉर्पोरल ह्यापेक्षां मोठा नव्हता. स्वतःची कामगिरी तो चांगली बजावीच, शिवाय भोंवताली ज्या ज्या

गोष्टी चालत त्या सर्वांवर त्याची नजर असे. दोस्त राष्ट्रांनीं शत्रुसैन्यांत बंडाळी माजविण्यासाठीं चालविलेले प्रयत्न, सैन्यांत असंतोष फैलाविण्यासाठीं विमानांतून टाकण्यांत येत असलेलीं लाखो हस्तपत्रकें वगैरेवर त्याची सक्त नजर होती व आपल्याकडील लोकांनीं सुद्धां अशा उपायांचा अवलंब करावा असें तो ह्मणे. शंभरदां तीनतीच गोष्ट कंठशोष करून सांगितली तर एकशेंएकाव्या वेळीं तरी ऐकणाराचा त्यावर विश्वास बसेल असें तो प्रतिपादी. चळवळीचा मार्ग स्वीकारल्याने पुष्कळशी कार्यसिद्धि होते असा त्याचा विश्वास होता. दिवसाचे युद्ध थांबल्यावर शीण घालविण्यासाठीं कोणी विनोदी गोष्टी सांगितल्या तर त्याला तें खपत नसे. त्याच्या अशा स्वभावामुळें त्याला मित्र फार थोडे लाभले. बर्लिन हॉस्पिटलमधून परत जातांना त्यानें युद्धकालांतील बर्लिन व म्यूनीक शहरांतील आयुष्यक्रम पाहिला. त्याची तर त्याला चीडच आली. हिटलरसारख्या खडतर परिस्थितींत दिवस काढलेल्या माणसाला राजधानींतील बऱ्या अधिकाऱ्यांनीं स्त्रीजनांच्या सांनिध्यांत प्रेमचेष्टा करीत दिवस घालविणें खपलें नसल्यास नवल नाहीं.

जर्मनीच्या सर्वाधिकाऱ्याच्या वयाची पहिली तीस वर्षें अशा तऱ्हेनें व्यतीत झालीं.



## प्रकरण दुसरें

---

## पुढारीपण

## तयारी व पूर्वरङ्ग

महायुद्ध संपल्यावर जर्मनींत सर्वत्र अंदाधुंदीच होती. कायसरच्या राज्य-त्यागाला जर्मनींत झालेली क्रांती कारण झाली कायसरनें राजसंन्यास घेतल्यावर जनतेच्या पुढाऱ्यांनीं आपल्या हातीं राज्यसूत्रें घेतलीं, पण त्यांच्या हातांत फारशी सत्ता नव्हती. प्रान्तिक सरकारें बर्लिन सरकारला मुख्य मानीत, पण त्याचे हुकूम बजावण्याचे टाळीत.

बव्हेरिअन सरकार तर स्वतंत्र होण्याची वेळ आली होती—नव्हे कांहीं काळ तें स्वतंत्रही झालें होतें.

म्युनीक शहराचे पुढारी ट्रोलर व कर्ट आयस्नर ( Kurt Eisner ) यांनीं म्युनीकला सोव्हिएट स्थापन करण्याचा कट चालविला होता. आयस्नर जातीनें ज्यू होता व कांहीं काळ तो फॉरवर्ड पत्राचा संपादक होता. महायुद्धा-नंतर तो बव्हेरिअन सरकारचा अध्यक्ष होता. त्यानें युद्धदोषाचें खापर दोस्त राष्ट्रांनीं फक्त बर्लिनच्याच डोक्यावर फोडावें व त्या दोषांतून बव्हेरिआस मुक्त करावें म्हणून खूप खटपट केली.

महायुद्धांतील शिपाईगडी परत येऊं लागले होते. युद्ध जिंकण्याच्या त्यांनीं उराशीं बाळगलेल्या आशा पूर्ण विलयास गेल्या. परत आल्यावर ना काम ना धंदा अशी त्यांची स्थिति झाली होती. सकाळ संध्याकाळ हे लोक मौज करीत हिंडत. अशा वेळीं त्यांना गांठून एखाद्या चळवळ्यानें आपल्या भावनाप्रधान मिठ्ठास वाणीनें आपल्या ज्ञानाची सरबत्ती सुरू केली की, ते त्याच्या पक्षास मिळण्यास

तयार असत. अशा स्थितीचा ट्रोलर व आयस्नर फायदा घेत होते व त्यांनीं बव्हेरियाचें स्वतंत्र सोव्हिएट सरकार स्थापण्याचा प्रयत्न चालविला होता. पण ह्या प्रयत्नास यश येण्यापूर्वींच म्हणजे फेब्रुआरींत ( सन १९१९ ) आयस्नर मारला गेला.

आयस्नरच्या मृत्यूला दोन महिने पुरे होतात न होतात तोंच म्यूनीकला सोव्हिएट लोकशाही पुकारण्यांत आली. सोव्हिएट पुकारणारांनीं केवळ दंडेलीच केली. कौन्सिलमध्यें बोलशेव्हिक अल्पसंख्याक होते व बहुसंख्याक सोशिआलिस्टांनीं स्वतंत्र सरकार पुकारण्याविरुद्ध आपलें मत दिलें होतें. परंतु लष्कराच्या बळावर बोलशेव्हिकांनीं सोव्हिएट सरकार स्थापन झाल्याची घोषणा केली. सर्व रस्त्यांवर लष्करी पहारे फिरूं लागले, व शहराच्या मुख्य मुख्य चौकांत मशीनगन्स सज्ज करून ठेवण्यांत आल्या. क्रान्तिकारकांनीं शहर आपल्या ताब्यांत घेतल्यानें बव्हेरिअन सरकार उत्तरेस बॅम्बर्ग ( Bamberg ) येथें पळून गेलें, व तेथून क्रान्तिकारकांचा मोड करण्याची तजवीज करूं लागलें. सोव्हिएट सरकार स्थापन झाल्याबरोबर त्यानें विश्वविद्यालयें, वर्तमानपत्रें, वाहतुकीचीं साधनें वगैरे राष्ट्राच्या मालकीचीं करण्याचा उपक्रम चालविला, व सर्व गोष्टी सुरळीत चालण्यासाठीं एग्लेहोफरला लष्करी सर्वाधिकारी नेमण्यांत आलें. एग्लेहोफरनें सर्वाधिकार मिळाल्याबरोबर " बारा तासाच्या आंत सर्व नागरिकांनीं आपल्या जवळचीं सर्व शस्त्रास्त्रें सरकारांत जमा करावींत. असें जो करणार नाहीं त्यास गोळी घालून मारण्यांत येईल " असें फर्मान काढलें.

ह्या सुमारास हिटलरची गेलेली दृष्टि त्याला पुनः प्राप्त झाली होती. पासेवॉकहून तो म्यूनीकला आला होता. सर्व पक्षोपक्षाकडे तो बारकाईनें पाहूं लागला. निरनिराळ्या पक्षांच्या सभांतही त्यानें भाग घेतला, पण कोणत्याही पक्षाला तो मिळाला नाहीं. तो पहिल्यापासूनच सर्व जर्मन वंशाच्या लोकांचें एक राष्ट्र असावें असें ह्मणणार असल्यानें बव्हेरिआच्या विभक्तीकरणाला अनुकूल असलेल्या पक्षांत सामील होणें त्याला शक्य नव्हतें. सोशिआलिस्ट पक्षासंबंधींसुद्धां त्याला फारशी

आपुलकी वाटत नव्हती. त्यामुळें तो रस्त्यांतून नुसता भटकत असे. अशा रीतीनें भटकत असतांनाच तो एका भयंकर संकटांतून वचावला. एग्लेहोफरच्या फर्माना प्रमाणें तो वागला नाहीं. हातांत पिस्तुल घेऊन चालला असतांना तो तिघा लष्करी शिपायांच्या दृष्टीस पडला. त्याबरोबर त्यांनीं त्याला टोंकलें परंतु त्या शिपायांवर पिस्तुल रोखून त्यानें त्यांना दटावले. ते शिपाई सशस्त्र होते तरीही हिटलरच्या दटावणीला ते भ्याले व पळून गेले.

फेब्रुआरी १९१९ ची म्युनीकमधील क्रान्ती अल्पजीवीच ठरली. म्युनीच शहर व त्याच्या आसपासचा थोडासा प्रदेश ह्या शिवाय बव्हेरियाच्या इतर शहरांच क्रान्तिकारकांना पाठिंबा मिळाला नाहीं. बर्लिन येथील मध्यवर्ती सरकार व बॅम्बर्गला पळालेलें बव्हेरिअन सरकार यांनीं म्यूनीकवर स्वारी करण्याची तयारी केली खुद्द म्यूनीक मधील बोल्शेव्हिस्ट सरकार विरुद्ध असलेले लोकही म्यूनीक शहरा बाहेर म्यूनीकवर हल्ला चढविण्याच्या इरादानें जमा झाले. थोड्याच दिवसांत बर्लिन व बॅम्बर्ग येथूनही कुमक आली.

या संयुक्त सैन्यास तोंड देण्यासाठीं म्यूनिकनेंही तयारी चालविली. सेनापत्य ट्रोलरला देण्यांत आले. ट्रोलर हा आत्यंतिक शांततावादी असल्यानें त्यानें सुरवा तीला शत्रुपक्षीयांकडे संदेश वगैरे पाठवून युद्धाचा प्रसंग न येईल तर पाहाव म्हणून खूप खटपट केली पण त्याला यश आलें नाहीं. एप्रिलअखेर क्रान्तिकारकांच बीमोड झाला व पूर्वीचें बव्हेरिअन सरकार पुनः म्यूनिकला येऊन राहिलें.

शहराला वेढा पडला असतांना क्रान्तिकारकांनीं ल्विटपोल्ड जिमन्याशि अमच्या प्रांगणांत दहा विरुद्ध पक्षीयांची कत्तल केली ह्या गोष्टीवांचून ही सर्वच प्रतिक्रान्ती बिलकुल रक्तपात न होता झाली असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

क्रान्ती संपवून बव्हेरिअन सरकार पुनः सुप्रतिष्ठित झाल्यावर हिटलरच्या चळवळीला सुरवात झाली, व येथून पुढें तो लोकांस माहीत होऊं लागला.

सुरवातीला हिटलरला दुसऱ्या पाईकदलाच्या क्रान्तीकालीन वर्तनाची चौकशी करण्यासाठीं नेमलेल्या समितीवर सभासद नेमलें. पुढें त्याला राज्यशास्त्राचे पाठ देणाऱ्या वर्गांतील व्याख्यानें ऐकण्यासाठीं पाठविण्यांत येऊं लागलें. दोस्तराष्ट्रांनीं जर्मनीवर व्हेर्साय येथें भलत्याच अटी लादल्या, त्याचें खापर सर्व पक्ष ज्यू व बोल्शेव्हिक लोक यावर फोडूं लागले. एका सभेंत एक जण ज्यू लोकांची बाजू घेऊन भांडू लागला, त्याला तेथेंच हिटलरनें आवेशयुक्त उत्तर दिलें. त्यामुळें त्याला एकेचाळिसाव्या स्युटसेन रेजिमेन्टमध्यें राज्यशास्त्राचे पाठ देण्यासाठीं नेमण्यांत आलें. पुढें त्याला राजकीय सभांतील बातम्या आणण्यासाठीं बातमीदार नेमण्यांत आलें.

एके दिवशीं हिटलरला जर्मन लेबर पक्षाच्या सभेस हजर राहण्यास सांगण्यांत आलें. ही सभा एक जंगी जाहीरसभा ह्मणून बोलावण्यांत आली होती. तींत श्रोतेवक्ते मिळून चोवीस पंचवीस लोक हजर होते. सभेचें अध्यक्षस्थान हर हारार यांनीं अलंकृत केलें होतें, व या छोटेखानी जंगी जाहीर सभेचे मुख्य वक्ते हर प्रोफेसर होते. वक्तेमजकुरांनीं जर्मनींत ज्यू व सोशिआलिस्ट लोकांचें वर्चस्व असल्यानें बव्हेरिआनें जर्मनींतून फुटून निघावें व ऑस्ट्रियाशीं संलग्न व्हावें असें प्रतिपादलें. जर्मनींतून फुटून निघावें असें प्रतिपादनांत आल्यामुळें हिटलर उत्तरादाखल भाषण करावयास उठला. तो ह्मणाला कीं, बव्हेरिआनें ऑस्ट्रियाशीं संलग्न व्हावें असें सूचित करण्यांत आलें आहे. ऑस्ट्रियाशीं संलग्न व्हावयाचें तर मग जर्मनींतून फुटण्याचें कारण काय ? ज्यूंची व सोशिआलिस्टांची भीति वाटत असली तर त्यांचा बीमोड करा, पण फुटून निघण्याची भाषा बोलूं नका. जर्मन आपल्या शत्रूशीं छातीठोक लढतो, शत्रूकडे पाठ फिरवून स्वतःचा बचाव करणें हें त्याचें ब्रीद नाहीं. जर्मन मनुष्यानें स्वतःच्या तत्त्वसिद्धिसाठीं न लढणें ह्मणजे स्वतःच्या ब्रीदास काळिमा फासणें आहे.

हिटलरच्या जोरदार भाषणाचा तावडतोब परिणाम झाला. तो सभागृह सोडून बाहेर पडतो न पडतो तोंच त्याच्या हातांत जर्मन मजूर पक्षाच्या उद्देशाचें व

कार्यक्रमाचें हस्तपत्रक ठेवण्यांत आलें. त्यानें तें न पाहतांच खिशांत कोंबलें. बरेच दिवस तें हस्तपत्रक त्याच्या खोलींत पडून होतें. एके दिवशीं झोंप येईना ह्मणून हिटलर वांचण्यासाठीं एखादें पुस्तक शोधूं लागला. त्या वेळीं जर्मन मजूरपक्षाचें चोपडें त्याच्या हातीं लागलें. कांहीं तरी वाचायचें ह्मणून त्यानें तेंच चोपडें त्या रात्रींत वाचून काढलें.

कांहीं दिवसांनीं त्याच्याकडे एक पत्र आलें. त्यांत 'तुह्माला मजूरपक्षाचे सभासद करून घेतलें आहे, तरी आपण मजूरपक्षाच्या पुढील सभेस हजर राहावें' अशी विनंती करण्यांत आली होती.

हिटलरच्या ध्यानींमनीं नसतांना त्याला जर्मन मजूरपक्षाचें सदस्यत्व प्राप्त झालें. पत्र आल्यावरसुद्धां त्याच्या मनांत जावें अगर जाऊं नये तें निश्चित ठरेना. मनाच्या अशा अनिश्चित स्थितींतच तो केवळ गंमत पाहण्याच्या इच्छेनें सभेस गेला.

ह्या सभेला पूर्वीच्या सभेपेक्षांही कमी श्रोते हजर होते. सभेस खजिनदारानें हिशेबाचा तक्ता सादर केला, त्यांत शिल्लक ७॥ मार्क दाखविली होती! मजूर पक्ष नांवाचा पक्ष अस्तित्वांत आहे असें फार थोड्या लोकांना माहीत होते. कोणतेंही वर्तमानपत्र ह्या पक्षाच्या सभासंमेलनाची हकीगत प्रसिद्ध करीत नसे. हिटलर मजूरपक्षास मिळाला त्यावेळीं त्या पक्षाची अशी स्थिति होती.

हिटलर सभेस गेला त्या वेळीं त्यानें मजूर पक्षाच्या कार्यक्रमाच्या तपशिला-विषयीं माहिती विचारण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. कांहीं सामान्य सिद्धांतावांचून कार्यक्रमाचा तपशिल असा कांहींच नव्हता. पितृभूमीचें सर्वांगीण हित साधणें व त्यासाठीं कम्युनिस्ट, सोशिआलिस्ट व ज्यू यांचें वाढलेलें वर्चस्व नष्ट करणें या पलीकडे पक्षाचा निश्चित असा उद्देश नव्हता. मजूरपक्षाचें आर्थिक धोरण कसें राहील, भांडवलवाल्यांशीं पक्ष कसा वागेल, यासंबंधीं पक्षाच्या सर्व योजना संदिग्ध होत्या. पक्षाच्या जाहीर पत्रकांतून जर कोणता स्वर प्रामुख्यानें निघत असेल

तर तो " मजुरांच्या मनांत आपण जर्मन आहोंत ही भावना प्रामुख्यानें वसली पाहिजे, व असली भावना प्रत्येक मजुराच्या मनांत जागृत करण्यासाठीं हा पक्ष अ यंत झटेल " हा होय.

अशा संदिग्ध गोष्टींनीं हिटलरचें समाधान होण्यासारखें नव्हतें. त्यानें पक्षाचे उद्देश व तपशील या विषयीं पुष्कळ खोदखोदून विचारलें, पण त्याचें समाधान होण्यासारखी उत्तरें मिळालीं नाहींत. तरीही शेवटीं मजूर पक्षाचा सभासद होण्याचें त्यानें ठरविलें व तसें सांगतांच सभेंत सर्वत्र आनंद व उत्साह दिसूं लागला. पक्षाचे अध्यक्ष हर हेरार यांनीं ज्या वेळीं सदस्यत्वाची पत्रिका हिटलरच्या हातांत ठेवली त्या वेळीं तीवर सातवा नंबर होता. अशा तऱ्हेनें हिटलर जर्मन मजूर पक्षाचा सातवा सभासद झाला. याच पक्षांचे पुढें जर्मन नॅशनल सोशालिस्ट लेबर पार्टींत ( नाझी ) रूपांतर झालें व हिटलर त्याचा सर्वाधिकारी बनला.

कांहीं दिवसांनीं हिटलरला मजूर पक्षाच्या मतप्रचार समितीचा मुख्य नेमण्यांत आलें. ह्या समितींत त्याच्या वांचून दुसरा सभासद नव्हता. मतप्रचार समितीचा मुख्य झाल्याबरोबर हिटलरनें आपल्या कामास सुरवात केली. त्याचा उत्साह आणि तडफ दांडगी होती. सुरवातीला वर्तमानपत्रांतून आपल्या पक्षाच्या सभांची हकीगत येण्यासाठीं त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. एका सभासदाच्या सूचनेवरून एका प्रमुख वर्तमानपत्राला त्यानें खोटें पत्र लिहिलें. त्यांत त्या वर्तमानपत्राच्या संपादकाला मजूरपक्षाच्या सभेंत अतोनात शिव्या देण्यांत आल्या वगैरे लिहिलें होतें. पण ह्या पत्राला संपादक महाशयांनीं केराची टोपली दाखविल्यामुळें हिटलरचा हाही प्रयत्न फुकट गेला !

मजूरपक्षाला पुढें आणण्यासाठीं हिटलरनें केलेले प्रयत्न एकामागून एक फुकट जाऊं लागल्या कारणानें पुढें काय करावें ह्याविषयीं सर्वांनाच चिंता पडली. शेवटीं हिटलरनें वर्तमानपत्राकडे न जातां स्वतःच्या पायावर उभें राहून प्रचारकार्य

करण्याचें ठरविलें. त्यानें तेवढ्यासाठीं एकामागून एक जाहीरसभा बोलावण्याचें ठरविलें. मजूरपक्षाची तिजोरी जवळ जवळ रिकामीच असल्यानें सभेच्या जाहिराती छापवून घेऊन वाटणें शक्य नव्हतें. सर्व सभासदांनीं थोड्या थोड्या जाहिराती लिहाव्यात आणि लिहिलेल्या जाहिराती ज्याच्या त्यानें वांटून याव्या असें हिटलरनें ठरविलें. जाहिराती लिहिण्यासाठीं कागदसुद्धां एका ओळखीच्या दुकानदाराजवळून एका स्वपक्षीय सभासदाच्या पतीवर आणावा लागला. अशा तऱ्हेनें परिश्रम करून बोलाविलेल्या सभेंत हाताच्या बोटांवर मोजण्याइतके श्रोते हजर राहिले. हिटलर त्यामुळें नाउमेद तर झाला नाहींच, उलट त्यानें आणखी जोरानें प्रयत्न करण्याचें ठरविलें. 'प्रयत्नाअंतीं परमेश्वर' ह्या म्हणीवर त्याचा दृढ विश्वास होता.

अखेर त्याच्या प्रयत्नाला यश येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. सुरवातीला मजूरपक्षाच्या सभांना फार थोडा समाज हजर असे. पुढें आपल्या वक्तृत्वामुळें हिटलर लोकांत इतका प्रिय झाला कीं, त्याचें व्याख्यान आहे असें समजावयाचा अवकाश, कीं व्याख्यानाचे जागीं श्रोत्यांच्या झुंडीच्या झुंडी लोटत. पुढें पुढें तर तो इतका लोकप्रिय झाला का, म्यूनिक शहरांतील सर्वांत मोठें सभागृहसुद्धां त्याच्या व्याख्यानाला लहान पडूं लागलें.

नुसत्या व्याख्यानबाजीनें आपलें कार्य होणार नाहीं, हें हिटलर जाणून होता. त्याबरोबर मजूरपक्षाचें बळ व सांपत्तिक स्थिति सुधारणें जरूर होतें. म्हणून त्या दिशेनें तो प्रयत्न करूं लागला. लोकांच्यापुढें कांहीं तरी भरीव कार्यक्रम ठेवणें अवश्य होतें व हिटलर तो ठरविण्याच्या नादांत होता.

त्याच सुमारास हर फेडर नांवाचा एक इंजिनिअर आपल्या अर्थशास्त्रविषयक कल्पना लोकांपुढें मांडत होता. मजूर पक्षाच्या सभासदांपुढें त्याचें एकदां व्याख्यान झालें. त्या व्याख्यानांत त्यानें भांडवलाचे दोन गट केले. पहिला गट कर्जाऊ दिलेल्या अनुत्पादक भांडवलाचा व दुसरा गट उद्योग धंद्यांत गुंतविलेल्या म्हणजे उत्पादक भांडवलाचा होय. पहिल्या गटांत फक्त सावकारी भांडवलाचा समा-

येश होतो. हें भांडवल अनुत्पादक आहे व अडीअडचणींमुळें लोकांनीं पैसे कर्जाऊ काढलेले असल्यामुळें त्यावर त्यास जबर व्याज द्यावें लागतें व परिणामीं पुष्कळशा शेतकऱ्यांना व कामकऱ्यांना हालांत दिवस काढावे लागतात. दुसऱ्या गटांतील भांडवल म्हणजे उद्योगधंद्यांत गुंतविलेलें भांडवल. अशा भांडवलानें देशाची प्रगती होण्यास मदत होते व उद्योग धंद्याची भरभराट होऊन सर्वांस चांगले दिवस दिसतात, असें फेडरनें प्रतिपादलें.

हर फेडरच्या व्याख्यानाचा हिटलरच्या मनावर पुष्कळ परिणाम झाला. मजूर पक्षाचें आर्थिक धोरण संदिग्ध होतें असें मागें सांगितलेंच आहे. भांडवलाची फेडरनें केलेली व्याख्या हिटलरला पसंत पडल्यामुळें त्यानें फेडरला मजूरपक्षाचा सभासद करून घेऊन त्याच्या सल्ल्यानें आपल्या पक्षाचें आर्थिक धोरण ठरविलें. फेडर आज नाझी पक्षाचा आर्थिक सल्लागार आहे व त्याच्या संमतीवाचून त्या पक्षाच्या आर्थिक धोरणांत हिटलर केव्हांही फेरफार करीत नाहीं.

फेडरची भांडवलाची व्याख्या स्वीकारतांना हिटलरनें तींत जरूर ते फेरफार केले. जनतेला आपल्या पक्षाचें म्हणणें पटण्यासाठीं त्यानें आपलें अमोघ अस्त्रही उपयोगांत आणण्याचें सोडलें नाहीं. व्याख्यानांतून आणि वर्तमान पत्रांतून त्यानें असें प्रतिपादण्यास सुरवात केली कीं, जेवढें म्हणून अनुत्पादक भांडवल आहे तेवढें सर्व ज्यू आणि तत्सम लोकांचें आहे. जर्मनीला परावलंबीपणाच्या शृंखलांत कायमचें ठेवण्यासाठीं असें भांडवल त्यांनीं गुंतविलें आहे. जर्मनीला स्वतःच्या पायावर उभें राहावयाचें असेल तर सर्व अनुत्पादक भांडवल आपण बुडविलें पाहिजे. उत्पादक भांडवल जर्मन लोकांच्या मालकीचें आहे व तें जर्मनीच्या अंतिम हितासाठीं आहे, म्हणून त्याला आपण हात लावतां कामा नये.

आपल्या पक्षाचें आर्थिक धोरण थोडें फार निश्चित केल्यावर हिटलर आपलें पक्षबल वाढविण्याकडे व नाझी पक्षाची संघटना करण्याकडे वळला. खुद्द म्यूनिक शहराच्या निरनिराळ्या भागांत त्यानें मजूर पक्षाच्या शाखा स्थापन केल्या, व

डॉ. गोबेलच्या साहाय्यानें बव्हेरिआभर व इतर लहान लहान संस्थानांतून आपल्या शाखांचें जाळें पसरण्याचा उपक्रम सुरू केला. मजूरपक्षांच्या सभांतून सोशालिस्ट व कम्युनिस्ट यांचा उपद्रव होऊं नये म्हणून ordnergruppen नांवाचीं स्वयंसेवक पथकें त्यानें स्थापन केलीं. या पथकांकडे सुरवातीला सभांतून शांतता राखण्याचें काम होतें, पण पुढें ह्याच पथकांचें नाझी फौजेंत रूपांतर झालें. आपल्या पक्षाच्या सभासदांनीं कांहीं तरी विशिष्ट चिन्ह धारण करावें असें त्यानें ठरविलें व पक्षचिन्ह म्हणून स्वस्तिकाची योजना केली. स्वस्तिकाची नाझी पक्षाचें चिन्ह म्हणून योजना करण्यांत त्याचा हेतु असा होता कीं, स्वस्तिक पाहून सर्व लोकांच्या मनांत आर्य संस्कृतीच्या अध्यात्मिक श्रेष्ठतेची भावना जागृत होऊन त्यांनीं ती श्रेष्ठता कायम टिकविण्यसाठीं अहर्निश झटावें. नाझींचे निशाणामागें पण हीच विचारपरंपरा आहे. नाझीपक्षाचें सर्व निशाण तांबड्या रंगाचें असून त्यावर मध्यभागीं स्वस्तिकांकित शुभ्र वर्तुळ आहे. ह्या निशाणांतील तांबडा रंग सर्व कामकरी लोकांना नाझीपक्ष आपल्या हितासाठीं झटणारा पक्ष आहे असें वाटून त्या पक्षाविषयीं त्यांच्या मनांत आपुलकी बसण्यासाठीं योजला आहे. नाझी चळवळ ही बोल्शेव्हिक चळवळी विरुद्ध प्रतिक्रियारूप आहे असें दर्शविण्यासाठी पांढरें वर्तुळ आहे. व जर्मन आर्य वंशीयांचें अध्यात्मिक पावित्र्य नाझीपक्षाच्या सतत डोळ्यापुढें आहे, हें दाखविण्यासाठीं स्वस्तिकाची योजना करण्यांत आली आहे.

आतांपर्यंत हिटलर नाझी पक्षाच्या मतप्रचार समितीचा अध्यक्ष या नात्यानें काम करीत होता, पण येथून पुढें तो नाझींचा उपाध्यक्ष व सर्वाधिकारी बनला.

# प्रकरण तिसरें

## अयशस्वी चढाई

इ. स. १९२३ उजाडलें त्या वेळीं हिटलरचें नांव जर्मनींत सर्वतोमुखीं झालें होतें. तो जर्मन Nationalsozialistische Deutsche Arbeiter Partei पार्टीचा सर्वाधिकारी झाला होता. ह्याच वेळीं जर्मनींतील सर्व जनता हवालदिल झाली होती. मार्क नाणें घसरगुंडीला लागलें होतें. घसरत घसरत त्याची किंमत इतकी उतरली होती कीं, एका पौंडाला लक्षावधी कागदी मार्क मिळत असत. ह्या परिस्थितीचा पूर्ण फायदा घेण्याचें हिटलरनें ठरविलें. दुसरीही गोष्ट हिटलरच्या पथ्थावर पडली. युद्धखंडणीचा हप्ता मार्क नाण्याच्या घसरगुंडी-मुळें जर्मनी देऊं शकला नाहीं. त्यामुळें व्हेर्सायचा तहांतील एका कलमाचा फायदा घेऊन र्‍हाईन व र्‍हूर हे जर्मनींतील औद्योगिक महत्वाचे प्रांत कर्जफेडीसाठीं हमी ह्मणून फ्रान्स व बेल्जम या दोन राष्ट्रांनीं कब्जांत घेतले. या गोष्टीस बर्लिन सरकारनें आपणाकडून शक्य तेवढा विरोध केला, पण विजयानें मस्त झालेल्या फ्रेंच व बेल्जम सरकारापुढें हतबल जर्मन राष्ट्राचें कांहींच चाललें नाहीं.

नाझी पक्षानें ह्या संधीचा फायदा घेण्याचें ठरवून आपली चळवळ जोरानें पुढें चालू ठेविली. मनगटाच्या जोरावर बव्हेरिअन सरकार हस्तगत करून नंतर उरलेला जर्मनी आक्रमावयाचा असें हिटलरनें ठरविलें व त्या दिशेनें त्यानें आपला उद्योग चालू केला. हिटलरच्या चळवळीवर बर्लिन सरकारची सक्त नजर होती. हिटलरला सुट्टं ठेवलें तर त्याची सरशी होऊन सोशालिस्टांना जर्मनीच्या राज्यकारभारांतून पार काढून देण्यांत येईल अशी त्या वेळचे राष्ट्राध्यक्ष एबर्ट यांस धास्ती पडली. बव्हेरिआंत बंदोबस्त नीट राहण्यासाठीं एबर्टनें गस्टाव फॉन्

काहर ह्याला मुख्य अधिकारी नेमून त्याच्या हातांत अनियंत्रित सत्ता दिली. तसेंच बव्हेरिअन सैन्याच्या नायकाला जादा अधिकार दिले.

ह्याच सुमाराला लुडेन्डॉर्फ नाझीपक्षाला येऊन मिळाला हा शुभ शकुनच झाला असें हिटलरला वाटलें व त्यानें जबरदस्तीनें बव्हेरिआ ताब्यांत घेण्याचें ठरविलें. असें ठरविण्यास आणखीही एक दोन कारणें होतीं. बव्हेरिआचा मुख्याधिकारी फॉन् काहर व राइशश्वार ( जर्मन सेनेचा ) बव्हेरिआंतील मुख्य सेनापती फॉन् लॉसो हे दोघेही लोकशाहीच्या विरुद्ध होते. शिवाय म्यूनिकचा मुख्य पोलिस अधिकारी कर्नल फॉन् सायसर हाही थोडा फार हिटलरला अनुकूल होता. अशी संधी पुनः येणारी नव्हती. ह्मणून ह्या संधीचा त्यानें पूर्ण फायदा घेण्याचें ठरविलें.

तारीख ८ नोव्हेंबर १९२३ रोजीं रात्रीं साडे आठ वाजतां राष्ट्रीय सरकार स्थापन झाल्याची हिटलरनें घोषणा केली. ता. ८ नोव्हेंबर हा दिवस राज्यक्रान्तीसाठीं योजण्यांत हिटलरनें दूरदर्शित्व दाखविलें होतें. त्याच दिवशीं सोशालिस्ट क्रांन्तिकारकांनीं जर्मनींतील कायसरचें राज्य संपुष्टांत आणून लोकशाही पुकारली. सोशालिस्टांनीं केलेल्या ह्या क्रान्तीला नाझीपक्षीयांनीं ' असावधावस्थेंत केलेला वार ' असें ठरविलें व त्याचा सूड घेण्याच्या इरादानेंच हिटलरनें नोव्हेंबर महिन्याची आठ तारीख आपल्या प्रतिक्रान्तीच्या दिनासाठीं मुक्रर केली. त्या रात्रीं फॉन् काहर हा स्वातंत्र्य–दिन साजरा करण्यांत गुंतला होता. फॉन् लॉसो व कर्नल सायसर हेही त्याच्या समवेत होते. रोझेनहाइमरस्ट्रास वरील भव्य प्रासादांत जमलेल्या नागरिकांपुढें उभा राहून तो आपलें भाषण शांतपणें वाचत होता. इतक्यांत हिटलर आपल्या अनुयायांसह तेथें येऊन दाखल झाला. एकवार जमलेल्या लोकांकडे पाहून दोघां शरीरसंरक्षकांबरोबर तो प्रासादांत शिरला. मुख्य दिवाणखान्यांत जाऊन त्यानें काहर, लॉसो व सायसर यांस शेजारच्या खोलींत नेलें व लुडेन्डॉर्फ ह्यास बोलावणें पाठविलें. या चौघांपैकीं कोणासही हिटलरच्या बेताची कल्पना नव्हती. काहर जरी लोकशाही विरुद्ध असला तरी पुंडावा माजवून सत्ता बळकावणें त्याला पसंत नव्हतें, ह्मणून हिटलरच्या बेताला त्यानें विरोध

केला. पण हिटलर त्या वेळीं बहुजनसमाजाचा नेता असल्यामुळें शेवटपर्यंत विरोध करणें काहरला शक्य झालें नाहीं. शिवाय हिटलर व काहर या दोघांमध्यें बोलणें चाललें असतांनाच लुडेन्डॉर्फ तेथें येऊन दाखल झाला व त्यानेंही काहरला तूं हिटलरपक्षाला मीळ असा आग्रह केला. कांहींसा विचार करून शेवटीं हिटलरनें काढलेल्या राष्ट्रीय सरकारच्या जाहीरनाम्याला काहरनें संमति दिली. कर्नल सायसर व फॉन लॉसो यांनींही त्याचें अनुकरण केलें. इतकें झाल्यावर लुडेन्डॉर्फ, हिटलर, लॉसो आणि सायसर यांच्या सह्यानिशीं तो जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. ह्या जाहीरनाम्या अन्वये स्वतः हिटलर राष्ट्रीय सरकारचा सर्वाधिकारी बनला, लुडेन्डॉर्फला जर्मन सेनेचें मुख्य सेनापतिपद देण्यांत आलें, फॉन् काहरला बव्हेरिआचा मुख्याधिकारी करण्यांत आलें व लॉसो व सायसर यांना अनुक्रमें युद्धमंत्री व जर्मनपोलीसचे मुख्याधिकारी यांच्या जागा मिळाल्या.

पण हिटलरचें राष्ट्रीय सरकार पुरतें चोवीस ताससुद्धां टिकलें नाहीं. ब्वेरगेर-ब्रॉकेलर ( Buergerbraeukeller ) मधुन काहर, लॉसो व सायसर ही त्रयी बाहेर पडली ती हिटलर पक्षांतून फुटून निघण्याच्या इराद्यानेंच बाहेर पडली. हिटलरला ह्या तिघांच्या विषयीं संशय बाळगण्याचें बिलकुल कारण नव्हतें. तिघेजणही लोकशाही विरुद्ध आहेत हें जगजाहीर असल्यानें हिटलरनें त्यांच्या हालचालींवर लक्ष ठेवलें नाहीं. त्यामुळें हिटलरचा डाव हाणून पाडणें त्यांना शक्य झालें. हिटलरच्या कचाट्यांतून सुटल्यावर काहरनें पहिली गोष्ट केली ती ही कीं, म्यूनिकमधील सैन्यांत त्यानें अशी घोषणा केली कीं आह्मीं राष्ट्रीय सरकार स्थापन होण्याला संमति दिली ती राजीखुषीनें दिली नाहीं, पिस्तुलें रोखून राष्ट्रीय सरकारच्या जाहीरनाम्यावर आमच्या सह्या घेण्यांत आल्या; तरी सैनिकांपैकीं कोणीही जाहीरनाम्यावर विश्वास ठेवूं नये. तसेंच एक फर्मान काढून त्यानें ओबरलांड व राइखफ्लाग हीं हिटलर पक्षाचीं दोन सैनिकदळें बेकायदेशीर ठरविलीं. बर्लिनवर स्वारी करण्याच्या इराद्यानें जंगी फौज घेऊन हिटलर निघणार होता, ह्या स्वारीपूर्वीं म्यूनिक शहरांत ह्या फौजेची थाटाची मिरवणूक निघणार होती. ही मिरवणूक निघूं न देण्याचा काहरनें निश्चय केला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं म्यूनिकमधील लोक उठून पाहतात तों रस्त्यांवर, पुलांवर, चौकांत, सार्वजनिक इमारतींवर जिकडे तिकडे राइशश्वारमधील सैनिक दिसत होते. त्याच दिवशीं प्योहनर ( Poehner ) नांवाच्या नाझींच्या एका पुढाऱ्याला डॉ. काहरच्या हुकमावरून लॉसोनें अटक केली. संध्याकाळीं म्यूनिकमध्यें बर्लिनवर स्वारी करून जाणाऱ्या फौजेची मिरवणूक निघणार होती. मिरवणूक निघूं न देण्याचें काहरनें ठरविलेंच होतें. तेवढ्यासाठीं शहरांतील मुख्य रस्त्यावर पोलीसस्वार ठेवण्यांत आलें. काहरनें आपल्याकडून शक्य तेवढा बंदोबस्त केला असतांनाही मिरवणूक निघावयाची ती निघालीच. मिरवणुकीच्या अग्रभागीं लुडेन्डॉफ, हिटलर. डॉ. फ्रिक वगैरे पुढारी मंडळी अश्वारूढ होऊन चालली होती. त्या सर्वांवर मिरवणूकबंदीची नोटीस सरकारनें बजावली, पण तिला न जुमानतां लुडेन्डॉर्फनें ( राष्ट्रीय सैन्याचा मुख्य सेनानायक ) आपल्या लोकांस शिस्तीनें चालण्याचा हुकूम केला. शिवाय राइखफ्लाग दळाच्या कॅप्टन ऱ्होमनें राइखफ्लागच्या सैनिकांनीं मिरवणुकीच्या वेळीं रक्तपात करूं नये असें फर्माविलें. हिटलरची सुद्धां रक्तपात होऊं नये अशीच इच्छा होती. पण सरकारला मिरवणूक निघूं द्यावयाची नसल्यानें ती बंद राखण्यासाठीं वाटेल त्या उपायांचा अवलंब करण्याचें ठरवून अंतिम उपाय म्हणून राइशश्वारचे सैनिक सरकारनें तयार ठेवले होतें. पोलिसांना मिरवणूक आवरत नाहीं असें दिसल्यावर त्यांनीं मिरवणुकीवर बंदुकी झाडल्या व ती सूचना समजून राइशश्वारनें मिरवणूक उधळून लावण्यासाठीं तिच्यावर हल्ला केला. ह्या हल्ल्यांत हिटलरकडील चौदा इसम मृत्युमुखीं पडले, व पुष्कळांना जखमा झाल्या. त्याच वेळीं बहुतेक सर्व पुढाऱ्यांना अटक करण्यांत आली, पण हिटलर मात्र सांपडला नाहीं. तो ढुंगझिंग येथें पळाला व तेथें आपले सैनिक गोळा करण्याचा त्यानें प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. त्याला ता. ११ नोव्हेंबर रोजीं उफिंग मुक्कामीं अटक करण्यांत येऊन म्यूनिकला आणण्यांत आलें.

नाझीपक्षाच्या पुढाऱ्यांना पकडल्यावर बव्हेरिअन सरकारनें आपला अंमल अतिशय कडक केला. हिटलरचा फोटो सार्वजनिक ठिकाणीं लावण्याची बंदी

करण्यांत आली; नाझी पक्षाचें प्रमुख वर्तमानपत्र फोकिश ब्योबाखटर ( Völkische Beobachter ) जप्त करण्यांत आलें; नाझी पक्षीयांनीं आपला ' युनिफॉर्म ' घालून हिंडू नये असें फर्माविण्यांत आलें. नाझी पक्ष बेकायदेशीर असल्याचें फर्मान आधींच काढण्यांत आलें होतें, आतां त्या पक्षाची मुख्य कचेरीही सरकारनें आपल्या ताब्यांत घेतली. सरकारी कचेऱ्या व बड्या अधिकाऱ्यांच्या राहण्याच्या जागा वगैरेवर सुरक्षिततेसाठीं पाहारे ठेवण्यांत आले.

आतां पर्यंत नाझींच्या दहा पुढाऱ्यांनाच अटक करण्यांत आली होती. ते ह्मणजे हिटलर, लुडेन्डॉर्फ, डॉ. फ्रिक, डॉ. प्वोहनर, कॅपटन ऱ्होम, वेबर, ब्रूकनर, पर्नेट, वॅगनर व क्रीबेल हे होत. येवढ्या पुढाऱ्यांवरच सरकारनें राजद्रोहाची फिर्याद दाखल केली. खटल्याची सुनावणी म्यूनिक मधील मिलटरी ॲकडमी मध्यें झाली. ह्या खटला ऐकण्यासाठीं कोर्टांत प्रवेश मिळावा म्हणून सरकारनें पास ठेवले होते. हे पास फार कसोशीनें देण्यांत आले होते. ह्या खटल्याचें काम दोन महिने चालले. आरोपींनीं फिर्यादी पक्षाच्या साक्षीदारांची घेतलेली उलट तपासणी फार सुंदर झाली. विशेषतः हिटलर, डॉ. प्वोहनर व डॉ. फ्रिक यांनीं विचारलेल्या प्रश्नाचीं उत्तरें देणें साक्षीदारांना जड गेलें. डॉ. काहर ज्या वेळीं साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत उभा राहिला त्यावेळीं त्याची उलट तपासणी ऐकण्यास नेहमीं पेक्षां अधिक लोक हजर होते. पण त्यानें स्वतःच्या अधिकारबलावर स्वतःवरच निर्बंध घालून घेतले. नाझी पक्षाशीं त्यानें अथ पासून इति पर्यंत जें वर्तन ठेवलें त्या विषयीं त्याला विचारतांच तो राष्ट्रहितावर दृष्टी ठेऊन ह्या प्रश्नास उत्तर देतां येत नाहीं असे सांगे. त्यामुळें बंडांत त्यानें कितपत भाग घेतला तें न्यायमूर्तींना कळलें नाहीं.

हिटलरनें आपल्या बचावासाठीं चार तास भाषण केलें. कोर्टांतील ते चार तास ह्मणजे सर्वांत वक्तृत्वाची मेजवानीच वाटली. त्याचा बोलण्याचा आशय असा होता कीं, ' ज्या मनुष्याची राजकारणाकडे सहज प्रवृत्ति आहे, तो कांहीं झालें तरी राजकारणाचे डाव खेळल्या वांचून राहणार नाहीं. पक्षांची ज्याप्रमाणें गाण्याकडे सहज प्रवृत्ति असते, त्याप्रमाणें असल्या माणसांची राजकारण चाल-

विण्याकडे सहज प्रवृत्ति असते. माझेंही कार्य पक्षांच्या गायनाप्रमाणें सहज प्रवृत्त आहे, आणि त्यामुळेंच तें सतत चालू राहील. आमची सेना दिवसें दिवस वाढत आहे, आणि ती सारखी वाढत राहील......तुह्मी मला शिक्षा करणार हें निश्चित असून ती किती होईल हेंही मी जाणतों. पण ह्या खटल्याबरोबरच ह्या प्रकरणाची चौकशी संपली असा मात्र भ्रम बाळगूं नका. परमेश्वराच्या न्यायासनासमोर आमची चौकशी होईलच. त्यावेळीं तुह्मीं विचारल्याप्रमाणें तेथील न्यायाधीश आह्माला असें विचारणार नाहीं कीं, 'तुह्मीं राजद्रोह केलात काय?' त्याचा प्रश्न 'तुह्मीं पितृभूमीच्या उन्नत्यर्थ झटलांत काय?' असा असेल. येथें तुह्मी आह्माला खुशाल शिक्षा द्या—एकदां नव्हे हजारदां शिक्षा करा—परंतु तो सर्व श्रेष्ठ न्यायाधीश आह्माला खात्रीनें निर्दोषी ठरवील.' हिटलरचें भाषण संपतांच कोर्टांत टाळ्यांचा कडकडाट झाला. कांहीं जणांनीं 'हिटलरकी जय', 'लुडेन्डॉर्फ का जय' अशा अर्थाचा जयघोष करण्यासही कमी केलें नाहीं.

न्यायाधिशांनीं लुडेन्डॉर्फशिवाय सगळ्यांनाच शिक्षा ठोठावल्या. हिटलर, वेबर, डॉ. प्वोहनर व लेफ्टेनंट कर्नल क्रीबेल यांना प्रत्येकीं पांच वर्षांची व इतरांना सवा वर्षाची शिक्षा सांगण्यांत आली. हिटलर आदींना शिक्षा सांगतांना त्यांना सहामहिन्यांनीं सरकारनें सोडून द्यावें अशी न्यायमूर्तींनीं शिफारस केली.

शिक्षेनंतर हिटलर वगैरेनां लँडस्बर्ग येथील तुरुंगांत ठेवण्यांत आलें. तेथील तुरुंगाच्या मुख्य अधिकाऱ्यानें सर्व कैद्यांना चांगल्या रीतीनें वागविलें. हिटलरला रोज दोन तास फिरून येण्याची त्यानें मोकळीक दिली होती. या दिवसांत आपल्या पक्षांतील निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या हिटलरनें भेटी घेतल्या. शिवाय 'माईन काम्फ' नांवाचें आत्मवृत्तपर पुस्तक त्यानें लिहिलें. सन १९२३ पर्यंत आपल्याविषयींची हकीगत देऊन शिवाय आपल्या पक्षाचा इतिहासाची व धोरणाचीही माहीति माइन काम्फमध्यें त्यानें दिली आहे. हें पुस्तक त्यानें सहा महिन्याच्या अवधींत तुरुंगांत बसून लिहिलें, नंतर लवकरच न्यायमूर्तांच्या शिफारशीस अनुसरून हिटलरची सन १९२४ च्या डिसेंबर महिन्यांत मुक्तता करण्यांत आली.

# प्रकरण चवथें

## नाझी पक्षाची घटना

येथवर हिटलरच्या चरित्राची सन १९२४ पर्यंतची रूपरेखा आ' पाहिली. ही रूपरेखा संपविण्यापूर्वी नाझी पक्षाविषयीं सामान्य माहिती देणें अनुचित होणार नाहीं.

मागें लिहिल्याप्रमाणें हिटलरच्या पक्षाचें नाझी पक्ष असें मूळचें नांव नाहीं. नाझी पक्षाच्या मूळच्या संस्थापकांनी त्या पक्षाला 'जर्मन मजूरपक्ष' असें छोटें आणि सुटसुटीत नांव दिलें होतें, तें बदलून 'राष्ट्रीय साम्यवादी जर्मन कामगार पक्ष' (Nationalsozialistische Deutsche Arbeiter Partei) असें लांबलचक पण थोडेंसें अर्थपूर्ण नांव हिटलरनें आपल्या पक्षाला दिलें. नित्य वापरण्यांत हें लांबलचक नांव गैरसोयीचें वाटलें म्हणून त्याला सुरवातीला 'नाझी-सोझी' असें लघुरूप देण्यांत आलें होतें, पण हल्लीं 'नाझी' असें त्यापेक्षांही लघुतर रूप प्रचारांत आहे.

'नाझी' पक्षाविषयीं सामान्य माहिती देतांना ती दोन पृथक् पृथक् भागांत द्यावयास हरकत नाहीं. पहिल्या भागांत नाझी पक्षाच्या संघटनेविषयी व दुसऱ्या भागांस नाझी पक्षाच्या विचारासंबंधीं व धोरणासंबंधीं माहिती दिली आहे.

सुरुवातीला आपण नाझी पक्षाची संघटना कशी आहे तें पाहूं. इ. स. १९२२ नंतर युरोपियन राष्ट्रांतून जे जे नवीन पक्ष स्थापन झाले त्या त्याकडे आपण बारकाईनें पाहिलें तर आपणास असें आढळून येईल कीं, अशा प्रत्येक पक्षानें आप- आपलीं लष्करी दलें तयार केलीं आहेत. पक्ष स्थापनेबरोबरच त्या पक्षाच्या लष्करी

दलांची स्थापना करणें ही उसनवारीची कल्पना आहे, व ती मुसोलिनीच्या फासिस्ट सैनिक दलांची हुबेहुब नक्कल आहे. मुसोलिनीच्या फासिस्ट चमूनें इटालिअन सरकार विरुद्ध मिळविलेला जय पाहून ज्या पक्षाचें धोरण फॅसिझम सदृश होतें त्यांनी आपल्या पक्षाला संलग्न अशीं सैनिकदलें स्थापन केलीं. मुसोलिनीच्या फासिस्टांचे डगले काळे असले तर पोर्तुगालमधील फासिस्टांचे डगले निळे आहेत. जर्मनींत हिटलरचें नाझी सैन्य आहे तर ऑस्ट्रियांत त्याच धर्तीवर हाइमवेहर सैन्याची स्थापना झाली आहे.

हिटलरच्या नाझी फौजेच्या संस्थापनेचा इतिहास किंचित् भिन्न आहे. हिटलरचा पक्ष व त्याचें सैन्य यांची स्थापना एकसमयावच्छेदानें झालेली नाहीं. हिटलर हा पक्षबल वाढविणारा जरी असला तरी तो नाझी पक्षाचा संस्थापक नाहीं. शिवाय मुसोलिनीच्या फासिस्टांना विजय मिळाला तो इ. स. १९२२ सालीं. आणि त्यापूर्वींच नाझी पक्ष स्थापन झाला होता. सन १९२२ सालचा मुसोलिनीच्या रोमवरील हल्ला यशस्वी झालेला पाहून हिटलरच्या मनांत नाझी सेनेची स्थापना करण्याचें आलें व त्यानें ताबडतोब अशा सेनेची स्थापना केली. असें करण्यास त्याला फारसा वेळ लागला नाहीं. ऑर्डनर ग्रुप्पेन ( Ordner-gruppen ) नांवाचीं स्वयंसेवक पथकें त्याच्या पक्षांत पूर्वींपासूनच होतीं, याच पथकांचें त्यानें नाझी फौजेंत रूपांतर केलें व ह्याच वेळीं पक्ष संघटनेविषयीं कांहीं नियम तयार केले. हल्लीं नाझी पक्षाची संघटना खालीं दर्शविल्याप्रमाणें आहे.

ज्या इसमाला नाझीपक्षाचा सदस्य व्हावयाचें असेल त्यानें प्रथम ‘ नाझी पक्षाचें पंचवीस कलमी धोरण मला मान्य आहे ’ असें लिहून दिलें पाहिजे. नाझीच्या पंचवीस कलमी धोरणास लेखी मान्यता दिली म्हणजे तो इसम नाझी पक्षाचा सभासद झाला असें समजण्यांत येतें. अशा सभासदावर कोणत्याही प्रकारची जबाबदारी नसते. पक्षाचें संख्याबल वाढविण्याकडे व निवडणुकीच्या वेळीं सभासदांना मतें देण्याकडे अशा सभासदांचा उपयोग होतो.

नाझी पक्षाचा दुसरा भाग स्टर्म ॲब्टायलुंग ( Sturm abteilung ) हा होय. ह्यालाच इंग्रजींत शॉक् ट्रुप्स अगर स्टॉर्म ट्रुप्स (तुफान फौज) असें ह्मणतात. तुफान फौजेच्या प्रत्येक घटकाला पिंगट खाकी ( Brown ) रंगाचा ' पार्टी युनिफॉर्म ' देण्यांत येतो. पेहरणाच्या रंगावरूनच तुफान फौजेच्या घटकाला केव्हां केव्हां खाकी डगलेवाला ह्मणतात. नाझी पक्षाच्या कामगिरीवर असतांना व कवाइतीच्या वेळीं हा पोषाख घातलाच पाहिजे अशी सर्वांवर सक्ती आहे. फौजेचा मुख्य अधिकारी स्वतः हिटलर असून त्याला ओसाफ असें संबोधतात. गेल्या महायुद्धांत प्रसिद्धीस आलेल्या अनेक सेनानायकांच्या साहाय्यानें तो ओसाफची कामगिरी पाहातो.

ह्या सैन्याच्या घटनेसाठीं जर्मनीचे पांचविभाग करण्यांत आले आहेत. प्रत्येक विभागाच्या मुख्याला दुय्यम ओसाफ ह्मणतात. विभागाच्या अत्यंत खालच्या घटकाला मंडळ ( Gruppe ) अशी संज्ञा आहे. एका ग्रुपमध्यें तेरीं पाईक असतात. असे पुष्कळ ग्रुप मिळून एक ट्रुप ( Truppe ) होते व अनेक ट्रुप मिळून एक गॉस्टर्न ( Gausturm ) होतो. एकापेक्षां अधिक गॉस्टर्नची एक स्टॅंडर्ड ( Standarte ) होतो व अशा पुष्कळ स्टॅंडर्ड मिळून एक विभाग होतो.

प्रत्येक लहानमोठ्या घटकाच्या मुख्याच्या नेमणुकीचा प्रकारही ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. स्वतः हिटलर पांच विभागावरील पांच मुख्यांची नेमणूक करतो विभागावरील मुख्य आपल्या विभागांतील स्टॅंडर्डच्या मुख्याची नेमणूक करतो. अशा तऱ्हेनें प्रत्येक मोठ्या घटकाचा मुख्य त्या घटकांतील लहान घटकाच्या मुख्यांची नेमणूक करतो. ह्या सर्वांच्या जबाबदारीचें तत्व सुद्धां कांहींसे भिन्न आहे. स्वतः हिटलर नाझींचा सर्वाधिकारी असल्यानें तो कोणाला जबाबदार नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. तुफान फौजेच्या बाबतींत पांच विभागावरील पांच दुय्यम ओसाफ हिटरला जबाबदार आहेत. अशाच क्रमानें खालचा अधिकारी त्याला ज्यानें नेमलें

असेल त्याच वरच्या अधिकाऱ्याला जबाबदार असतो, इतर कोणत्याही वरच्या अधिकाऱ्याला तो जबाबदार नसतो.

तुफान फौजेशिवाय शुट्झस्टाफेल (Schutzstaffel) नांवाची नाझी पक्षाची आणखी एक फौज आहे. त्या फौजेचा दर्जा तुफान फौजेच्या पेक्षां वरच्या प्रतीचा आहे. शुट्झस्टाफेल मधील सैनिकांकडे नाझी पक्षाच्या सभासंमेलनाच्या संरक्षणाची व हेरांची कामगिरी असते. हिला हिटलरची 'खास फौज' असें समजण्यांत येते. ह्या फौजेच्या साहाय्यानें हिटलर स्वपक्षांतील कुचरांचें नियंत्रण करतो. नाझी पक्षांतील एखादा सभासद फंद फितुरी करीत असेल तर त्याला शुट्झस्टाफेल तावडतोब शासन करते. ह्या फौजेंत दाखल होणारा प्रत्येक इसम वयानें तेवीस वर्षांच्या वरचा व पस्तीस वर्षांच्या आंतला असावा लागतो. शिवाय ह्या फौजेंत दाखल होण्यापूर्वी कमींत कमी तीन वर्षे तरी तो नाझी पक्षाचा सभासद असला पाहिजे व एक वर्षभर त्यानें तुफान फौजेंत कामगिरी केलेली असली पाहिजे, त्याशिवाय त्याचा शुट्झस्टाफेलमध्यें शिरकाव होत नाहीं.

तुफान फौज व शुट्झस्टाफेल या दोहोंवर हिटलरचें पूर्ण नियंत्रण आहे. केवळ कवाइतीच्या वेळीच नव्हे तर इतर वेळीं सुद्धां सैनिकांनीं कसें वागावें त्याविषयीं हिटलर आज्ञा सोडीत असतो. ह्यासंबंधीं एक उदाहरण सांगतात तें असें कीं एकदां कांहीं नाझींनीं स्वतःच्या पतीवर एका उपहारगृहांतून कांहीं जिन्नस घेऊन खाल्ल्याचें हिटलरच्या नजरेस आलें, त्यानें तावडतोब 'अशा तऱ्हेचें वर्तन करणारांनीं आपली बाकी देऊन टाकावी' असा हुकूम सोडला व अशा तऱ्हेचें वर्तन करणें नाझी पक्षाला कमीपणा आणणारें असल्यानें पुढें जो असें वर्तन करील त्याला कडक शिक्षा करण्यांत येईल असें त्यानें जाहीर केलें.

हिटलरचा पक्ष खाजगी खडी फौज बाळगून असल्यामुळें हिटलरला फौजेच्या जोरावर सर्व जर्मनी पादाक्रान्त करावयाचा आहे असें त्याचे प्रतिपक्षी ह्मणतात. पण स्वतः हिटलर मात्र आपली चळवळ निव्वळ सनदशीर मार्गाचाच अवलंब करील असें ह्मणतो. "फौजेच्या साहाय्यानें शांतता भंग करणें हा माझा हेतु

नाहीं" असें त्यानें वारंवार जाहीर केलें आहे, व "नाझी सैनिकांच्या जवळ पिस्तुल अगर बंदुकीसारखें हत्यार सांपडल्यास त्याला नाझी पक्षांतून हांकलून देण्यांत येईल" असा जाहीरनामाही त्यानें एकदां काढला होता. हिटलरच्या विचारआचारांत कधींच एकरूपता नसते; जनांत एक, मनांत एक असें त्याचें स्वतःचें वर्तन असून त्याचे अनुयायी जाहीर रीतीनें नेहमीं रक्तपाताचा पुरस्कार करीत असतात असें हिटलरच्या कांहीं आक्षेपकांचें ह्मणणें आहे.

हिटलरच्या फौजेची संख्या सध्यां १ लक्षाच्या घरांत गेली असून दिवसे दिवस तींत अधिकाधिक भर पडत आहे. आठवड्यांतून एकदां पाळीपाळीनें सर्व फौजेला करमणुकीचीं साधनें फुकट पुरविण्यांत येतात व कामगिरीवर असणाऱ्या फौजेला थोडाफार भत्ताही देण्यांत येतो. या १ लक्ष फौजेचा खर्च कसा चालतो ह्याविषयीं पुष्कळांना आश्चर्य वाटतें, आणि ही खरोखरच आश्चर्य करण्यासारखी गोष्ट आहे. कारण दर आठवड्याला एक लक्ष लोकांना नाटकसिनेमा दाखविणें व केव्हां केव्हां भत्ता देणें आणि तेंही एका खाजगी राजकीय पक्षानें देणें ही लहान-सहान गोष्ट नाहीं. पुष्कळांच्या मतें हिटलरला ही मदत कारखानदार, जमीनदार वगैरेसारख्या बड्या बड्या पैसेवाल्या लोकांकडून होत आहे. कांहींच्या मतें इटलीं-तील फासिस्टपक्षाकडून नाझींना आर्थिक साहाय्य मिळत असावें. शिवाय अमेरिकेंत राहणारे जर्मन लोकही नाझी पक्षाला सढळ हातानें साहाय्य करतात. एका लेखकानें तर नाझींना मदत करणारांची यादीच प्रसिद्ध केली आहे. त्यांत क्रुप, थायसेन, मानस्मान वगैरेंचीं नांवें दिलीं आहेत. या मदतीच्या जोरावर हिटलरनें आपल्या नाझी पक्षास सुसंघटीत करून त्याचें कार्य आजवर अव्याहत रीतीनें चालविलें आहे.

## प्रकरण पांचवें

# नाझींचें परराष्ट्रीय धोरण

मागील प्रकरणांत आपण नाझी पक्षाची घटना कशी आहे तें पाहिलें, आतां नाझींचें परराष्ट्रीय धोरण कसें आहे तें आपण पाहूं

आपल्या पक्षाच्या नांवांत राष्ट्रीय हा शब्द घालून हिटलरनें आपल्या पक्षाची वृत्ति नेहमीं 'राष्ट्रीय' राहील असें सूचित केलें आहे, 'राष्ट्रीय' हें पद काय सुचवितें? 'राष्ट्रीय' हा शब्द पक्षाच्या अभिधानांत घातल्यानें काय फरक होऊं शकतो? राष्ट्रीय पक्ष म्हणजे स्वराष्ट्राचा सर्व बाजूंनीं अभ्युदय साधणारा पक्ष, स्वराष्ट्रास परराष्ट्रापेक्षां उच्च जरी नसली तरी परराष्ट्राचा पदवीच्या समान पदवी प्राप्त करून देणारा पक्ष. ज्या वेळीं स्वराष्ट्राचें आणि परराष्ट्राचें हितसंबंध परस्पर विरोधी असतील त्या वेळीं आंतरराष्ट्रीय राजनीतीला बाजूस झुगारून स्वराष्ट्राचाच अभ्युदय साधण्यासाठीं झटणारा पक्ष राष्ट्रीय पक्ष होय. राष्ट्रीयतेला आंतरराष्ट्रीयतेचें वावडें असतें. राष्ट्रीय पक्षाचें ब्रीद आधीं 'मी' व नंतर 'तुम्ही' असें असतें. नाझी पक्षाच्या अभिधानांतील राष्ट्रीय हें विशेषण असेंच सुचवितें कीं, नाझीपक्ष आधीं जर्मनांचा अभ्युदय साधील व हा अभ्युदय साधल्यावर परराष्ट्राला त्याचा अभ्युदय—आणि तोही अशा परकीयराष्ट्राचा अभ्युदय जर्मनांच्या अभ्युदयाच्या मूळावर येत नसेल तर—साधण्यास शक्य असेल तर मदत करील.

नाझी पक्षाच्या परराष्ट्रीय धोरणांत व जर्मनींतील इतर पक्षांच्या परराष्ट्रीय धोरणांत पुष्कळच एकवाक्यता आहे, व ह्या महत्वाच्या प्रश्नावरील एकवाक्यते-

मुळेंच नाझी पक्ष व ह्युगेनबर्ग ( Hugenberg ) आणि सेल्ट ( Seldte ) यांचा राष्ट्रीयपक्ष एक होऊन आज जर्मनीच्या राज्यकारभाराची धुरा वाहात आहेत.

व्हेर्सायचा तह जर्मनीतील निरनिराळया पक्षांच्या परराष्ट्रीय धोरणाचा पाया आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. इ. स. १९१४ चें युरोपिअन महायुद्ध सुरू होण्यापूर्वी सर्व बाबतींत श्रेष्ठ असलेला जर्मनी आज सर्व बाबतींत मागासलेला आहे त्याला व्हेर्सायचा तहच कारण आहे असें नाझी पक्षीयांचें म्हणणें आहे महायुद्धापूर्वी जगांतील कोणतेंच राष्ट्र जर्मनी येवढें बलाढ्य नव्हतें. पण आजची परिस्थिति अगदीं भिन्न आहे; युरोपांतील एखादें क्षुद्र राष्ट्र सुद्धां आज युद्धप्रसंग उद्भवला तर जर्मनीस सहज जिंकूं शकेल अशी परिस्थिति उत्पन्न होण्याला व्हेर्सायच्या तहानें जर्मनीवर लादलेल्या अन्याय्य अटी कारण झाल्या आहेत असें हिटलर ह्मणतो.

नाझी पक्षाच्या चळवळीचें अधिष्ठान झालेला व्हेर्सायचा तह तरी कसा आहे तें आपण पाहूं. त्या तहांतील जीं मुख्य कलमें जर्मनीला बदलून घ्यावयाचीं आहेत तीं ह्मणजे, युद्धदोषाचें खापर एकट्या जर्मनीच्या डोक्यावर फोडण्यांत आलें आहे तें कलम रद्द करणें, युद्धांतील नुकसान भरपाईबद्दल दोस्तराष्ट्रांना जर्मनीनें द्यावयाची खंडणी अजीबात बंद करणें, युद्धानंतर जर्मन साम्राज्यांतील वसाहती दोस्त राष्ट्रांनीं आपल्याकडे घेतल्या आहेत त्या जर्मनीला परत मिळवून देणें, जर्मनीच्या सरहद्दींवरील मुलखांची पुनर्रचना करण्यांत आली आहे ती बदलून जर्मनी पुनः पूर्ववत एक करणें व तहांतील जर्मनीच्या निःशस्त्रीकरणासंबंधीचा तहाचा पांचवा भाग बदलून घेणें.

वर उल्लेखिलेल्या व्हेर्साय तहाच्या पांचव्या भागान्वयें जर्मनीवर असे निर्बंध घालण्यांत आले आहेत कीं, जर्मनीनें आपलीं सर्व शस्त्रास्त्रें कमी करावींत, सक्तीचें लष्करी शिक्षण बंद करावें, घोडदळ आणि पायदळ मिळून फक्त १,००,०००

खडें सैन्य जर्मनीनें ठेवावें, कोणत्याही प्रकारचें युद्धोपयोगी लढाऊ विमान जर्मनीनें ठेऊं नये, जर्मन आरमारांत अधिकारी व दर्यावर्दी सैनिक मिळून १५,००० मनुष्यबळापेक्षां अधिक भरती करूं नये, जर्मनीच्या लढाऊ जहाजांचें वजन १,००० टनापेक्षां अधिक असूं नये, विषारी धुरासारखी युद्धाच्या वेळीं उपयोगी पडणारीं रासायनिकें जर्मनीनें तयार करूं नयेत, जर्मनीच्या सरहद्दीवर असलेले लढाऊ किल्ले व गढ्या दुरुस्त करूं नयेत अगर नव्यानें बांधूं नयेत, वगैरे.

व्हेर्सायच्या तहानें जर्मनीला सर्व बाजूंनीं जखडून टाकल्यामुळें त्याला आपलें सामर्थ्य वाढवितां येत नाहीं. आपल्याशिवाय इतर युरोपिअन राष्ट्रें तोंडानें 'शांतिपाठ' ह्मणत ह्मणत हातानें आपलें सैन्यबळ सर्व बाजूंनीं खंबीर करीत आहेत अशी परिस्थिति पाहिल्यावर ज्या राष्ट्राला आपला पूर्वींचा अत्युच्च दर्जा स्मरत आहे असें कोणतें स्वाभिमानी राष्ट्र प्रतिक्षणीं अधिकाधिक हीनतेला नेणारी परिस्थिति सहन करील ?

ही हीनता सहन न होऊनच ती नाहींशी करण्याच्या इराद्यानें जर्मनींतील राष्ट्रीय पक्षांनीं ह्या हीनतेचें कारण जो व्हेर्सायचा तह त्यावर सर्व बाजूंनीं हल्ला चढविला. नाझींनीं तर आपल्या प्रत्येक सभेंत ह्या तहाविरुद्ध ओरड केली. त्यांना हिटलर व गोबेल्स सारखे खंदे वक्ते लाभल्यानें जर्मन जनतेच्या मनांत व्हेर्साय तहाचा अन्याय्यपणा ताबडतोब भरवितां आला, व अशा परिस्थितींत हिटलरचें ह्मणणें पटून जर्मन लोक नाझी पक्षाचे सभासद होऊं लागले. नाझींच्या ह्या चळवळीचा परिणाम इ. स. १९३० सालीं झालेल्या राइखस्टागच्या निवडणुकींत दिसून आला. त्या निवडणुकींत एकंदर जागापैकीं २०% जागा नाझींनीं काबीज केल्या व राइखस्टागमध्यें नाझी पक्षाचे १०७ सभासद बसूं लागले.

नाझी पक्षाचा एकाएकीं झालेला हा प्रचंड विजय पाहून आतांपर्यंत जर्मनीची राज्यधुरा वाहणाऱ्या, सोशल डेमोक्रॅट, सेंटर, सोशालिस्ट आदि पक्षांना पुढील निवडणुकींत आपण हरणार कीं काय अशी भीति वाटूं लागली, व हें

भीतिस्थान नाहींसें करण्यासाठीं त्यांनीं आपल्या परराष्ट्रीय धोरणांत फरक करून ' व्हेर्साय तह बदलून घेतला पाहिजे, जर्मनीच्या सांपत्तिक स्थितीकडे लक्ष देतां ह्यापुढें दोस्त राष्ट्रांना नुकसान भरपाईबद्दल जर्मनीनें खंडणी देणें शक्य नाहीं ' असें बोलण्यास सुरवात केली, व आज जर्मनींत असा एकही पक्ष नाहीं कीं जो व्हेर्साय तहांतील ह्या ना त्या कलमाविरुद्ध बोलत नाहीं. अशा तऱ्हेनें सर्व जर्मनी आज व्हेर्सायतहाच्या विरुद्ध बोलत आहे, आणि जर्मन राष्ट्राच्या ह्या एकमुखी विरोधाला नाझी पक्षच कारणीभूत झाला आहे हें लक्षांत घेतां, एका बाबतींत तरी सर्व जर्मनीला एका मुखानें बोलावयास भाग पाडणाऱ्या हिटलरचा योग्य तो गौरव केला पाहिजे.

व्हेर्सायतहाविरुद्ध चळवळ करण्यास ह्या तहानेंच एक साधन उत्पन्न केलें आहे. तहाचा पांचवा भाग ज्या वेळीं लष्करी तज्ज्ञांनीं तयार केला त्या वेळीं अमेरिकेचे आत्यंतिक शांततावादी व भोळे अध्यक्ष बुड्रो विलसन यांनीं फारच आग्रह धरल्यामुळें फ्रेंच मुख्य प्रधान कपटनीतिपटु क्लेमाँसो यांनीं पांचव्या भागाला एक प्रस्तावना जोडण्याचें कबूल केलें. दोस्त राष्ट्रांवर वचनभंगाचा आरोप करण्यासाठीं ह्या प्रस्तावनेचाच जर्मनी उपयोग करीत आहे. ह्या प्रस्तावनेंत असें ह्मणण्यांत आलें आहे कीं भविष्यत् कालांत भूपृष्ठावर सर्वत्र शांतता प्रस्थापित व्हावी हा उदात्त हेतु लक्षांत बाळगून व ह्या हेतूच्या पूर्ततेसाठीं सर्व राष्ट्रांना निःशस्त्रीकरण करणें शक्य व्हावें ह्मणून, ह्या तहान्वयें जर्मनीवर जीं नियंत्रणें घालण्यांत आलीं आहेत तीं सर्व नियंत्रणें जर्मनी पूर्णपणें पाळील.

वरील प्रस्तावनेचा उल्लेख करून हिटलरनें असें जाहीर केलें आहे कीं व्हेर्सायच्या तहावर सह्या करणाऱ्या सर्व राष्ट्रांनीं जर्मनीच्या प्रमाणांत आह्मीही आपआपलीं शस्त्रास्त्रें कमीं करूं असें वचन दिलें आहे व हें वचन बंधनकारक असून सुद्धां फ्रान्स व इतर दोस्त राष्ट्रें शस्त्रसंन्यास करण्याची चालढकल करीत आहेत. त्यावरून आपलीं वचनें पाळण्याइतका सुद्धां प्रामाणिकपणा त्या राष्ट्रांत

शिल्लक नाहीं. इतर राष्ट्रें जर असें अप्रामाणिक वर्तन करणार असलीं तर तहांत निर्दिष्ट केलेलीं बंधनें पाळण्यास जर्मनी बांधलेला नाहीं. ह्या पुढें इतर राष्ट्रांनीं जर आपलीं शस्त्रास्त्रें कमी केली नाहींत तर जर्मनी पुनः शस्त्रास्त्रें धारण करील.' ह्या धोरणास अनुसरूनच आर्थर हेंडरसन यांच्या अध्यक्षतेखालीं भरत असलेल्या शस्त्रसंन्यास परिषदेंत जर्मन प्रतिनिधि बॅरन फॉन् न्यूराथ यांनीं जर्मनीच्या शस्त्रास्त्राबाबतींतील समानतेचा पुरस्कार केला व इतर राष्ट्रें जर आपलीं शस्त्रास्त्रें कमी करणार नसलीं तर जर्मनी शस्त्रसंन्यास परिषदेंतून उठून जाईल व इतर राष्ट्राशीं समान होण्यासाठीं त्याला योग्य वाटेल तो मार्ग जर्मनी स्वीकारील असें जाहीर केलें.

व्हेर्सायच्या तहानें ह्या शिवाय आणखीही जर्मनीची दुर्दशा उडविली आहे. ह्या तहान्वयेंच आफ्रिकेंतील जर्मन वसाहती दोस्त राष्ट्रांनीं आपल्या ताब्यांत घेतल्या, कांहीं ठिकाणीं जर्मनीची सरहद्द बदलून जर्मन साम्राज्याचें क्षेत्रफळ कमी केलें, डांझिग व झेस्कोस्लोव्हाकिआ वगैरे थोडे प्रदेश जर्मनसाम्राज्यांतून काढून त्यांस स्वायत्तता देण्यांत आली, आणि दक्षिण टायरोल व आलसेस–लॉरेन हे प्रांत इटली व फ्रान्स यांच्या ताब्यांत सोपविण्यांत आले. अशा अनेक तऱ्हांनीं जर्मनीला विपन्न करण्यांत आलें आहे. ही विपन्नावस्था व्हेर्साय तहाला मूठमाती दिल्यावांचून दूर होणारी नसल्यानें नाझीपक्षाचा त्या तहावर दांत आहे व तो वाटेल त्या मार्गानें बदलून घेण्याचा नाझी पक्षानें विडा उचलला आहे.

नाझीपक्षाच्या परराष्ट्रीय धोरणांत खालील गोष्टींचा अंतर्भाव होतो असें ह्मणतां येईल.

(१) युद्धदोष नाकारणें,

(२) दोस्त राष्ट्रांनीं आपल्या ताब्यांत घेतलेला जर्मन मुलुख बिनशर्त परत करावा अशी मागणी करणें,

( ३ ) युद्धांतील नुकसान भरपाईबद्दल दोस्त राष्ट्रांना देण्यांत येणारी खंडणी बंद करणें, व ही खंडणी देण्याविषयींच्या यंगच्या योजनेवर ज्या जर्मन अधिकाऱ्यांनीं सह्या केल्या त्या सर्वांस शासन करणें,

( ४ ) व्हेर्साय तहानें ठरविलेली जर्मनीची सरहद्द बदलून युद्धपूर्व असलेली जर्मनीची सरहद्द कायम करणें

( ५ ) शस्त्रास्त्रांचे बाबतींत इतर राष्ट्राशीं बरोबरीचे हक्क मागणें व इतर राष्ट्रें जर आपलीं शस्त्रास्त्रें कमी करून तीं जर्मनीच्या शस्त्रास्त्राइतकीं ठेवण्यास तयार नसतील तर जर्मनीनें आपलीं शस्त्रास्त्रें वाढवून तीं इतर राष्ट्रांच्या शस्त्रास्त्राइतकीं करण; वगैरे.

हिटलरच्या ह्या परराष्ट्रीय धोरणामुळेंच जर्मन जनता नाझी पक्षाची अनुयायी झाली आहे, आणि फ्रान्स व इंग्लंड हीं दोन राष्ट्रें जोंपर्यंत वरील मागण्या मान्य करणार नाहींत तोंपर्यंत वरील परराष्ट्रीय धोरण अनुसरणारा पक्षच जर्मनींत सत्ताधारी राहील असें ह्मणावयास हरकत नाहीं.

---

# प्रकरण सहावें

## नाझींचें 'गूढ' धोरण

परराष्ट्रीय धोरण हें कांहीं हिटलरच्या पक्षाचें वैशिष्ट्य नाहीं. कारण राष्ट्रीय पक्षाचें परराष्ट्रीय धोरणसुद्धां नाझी पक्षाच्या धोरणाप्रमाणेंच आहे. शिवाय जर्मनींतील इतर पक्षांनींही आपल्या परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतींत नाझी पक्षाचा मागोवा घेण्याचें ठरविलें आहे असें दिसतें. राहतां राहिला जर्मनीच्या अन्तर्गत व्यवस्थेसंबंधीं हिटलरनें आंखलेला कार्यक्रम. ह्याही कार्यक्रमांत हिटलरनें आपल्या पक्षाचें वैशिष्ट्य ठेवल्याचें दिसत नाहीं. कारण अन्तर्गत व्यवस्थेसंबंधीचा हिटलरचा कार्यक्रम ह्मणजे एक कंथाच आहे. त्या कंथेंत सोशालिस्टांचीं तत्त्वें सांपडतात, कम्युनिस्टांचा कार्यक्रमही ह्यांत दिसतो, श्रीमंत भांडवलवाल्यांना नाझींच्या कार्यक्रमाविषयीं आपुलकी वाटते, मध्यम वर्गाला नाझींच्या अन्तर्गतव्यवस्थेमुळें आपलें हित होईल असें वाटतें, आणि दुःखानें गांजलेल्यांना ह्या कंथेंत सौख्याचीं किरणें दिसतात. अशी कंथा तयार करणें हेंच हिटलरचें वैशिष्ट्य आहे असें ह्मणण्याला हरकत नाहीं. आपण आतां ही कंथा, ही गारुडाची पिशवी काय आहे तें पाहूं.

नाझी पक्षाच्या अन्तर्गत व्यवस्थेसंबंधीच्या धोरणाचा आपण खालीं दिलेल्या शीर्षकांखालीं क्रमानें विचार करूं.

( १ ) जर्मन आर्य वर्णाची श्रेष्ठता कायम राखण्यासाठीं तयार केलेली योजना,

( २ ) आर्थिक आणि सामाजिक धोरण,

( ३ ) सांस्कृतिक विनयन.

* * *

वरील तीन गोष्टींपैकीं पहिली योजना जगांत सर्वत्र गाजली आहे. त्या योजनेसंबंधीं जगाला कांहीं माहीत नसलें तरी ती अमलांत आणण्यासाठीं योजलेल्या उपायांचा आज सर्वत्र गवगवा झाला आहे आणि असा गवगवा होण्याला प्रमुख कारण ह्मणजे ज्यू लोकांचा होत असलेला छळ होय. नाझी पक्षाची कोणतीही योजना घ्या तींत ज्यू लोकांचें भूत भेडसावीत नाहीं असें क्वचितच दिसून येईल. एवढ्यासाठींच नाझींच्या टीकाकारांनीं त्यांच्या धोरणाला 'जर्मन राष्ट्रा ऊठ!' 'यहुद्यांनों काळें करा!' ( Deutschland erwache! Juda verreck! ) असें थोडक्यांत नांव दिलें आहे.

जर्मन आर्यवर्णाची श्रेष्ठता कायम राखण्यासाठीं तयार केलेल्या योजनेंतील पहिला भाग ह्मणजे सर्व जर्मन वर्णीय राष्ट्रांचें एकीकरण करणें हा होय. ह्याच चळवळीला जर्मनींत आंश्लुस ( Anschluss ) चळवळ ह्मणतात. ह्या चळवळीचा जन्म ऑस्ट्रियांत झाला व आपल्यापक्षाचें एक ध्येय ह्मणून हिटलरनें त्याचा स्वीकार केला जर्मनी, ऑस्ट्रिया व हंगेरी यांचें एका सत्तेखालीं साम्राज्य निर्माण करणें हा ह्या चळवळीचा हेतु आहे. पण अशा एकीकरणाला फ्रान्सचा व मध्ययुरोपांतील छोट्या राष्ट्रांचा विरोध आहे. जर्मनी, ऑस्ट्रिया, व हंगेरी ह्या तीन राष्ट्रांचें एक राष्ट्र झालें तर आर्थिक बाबतींतील युरोपखंडाचें पुढारीपण अशा संयुक्तराष्ट्राकडे जाईल व असा संयुक्त जर्मनी सर्व युरोपखंडास भारी होऊन बसेल अशी फ्रान्सला भीति वाटत आहे; आणि तेवढ्याचसाठीं वरील तीन राष्ट्रांनीं आपसांत व्यापार व जकातीसंबंधीं १९३१ सालीं तह केला होता तो तह व्हेर्सायच्या तहाच्या विरुद्ध आहे अशी ओरड करून फ्रान्सनें हाणून पाडला. असें असलें तरी जर्मन वर्णाच्या सर्व राष्ट्रांचें एक संयुक्तराष्ट्र करण्याची महत्वाकांक्षा नाझी पक्षानें उराशीं बाळगली आहे.

जर्मनी केवळ जर्मन लोकांसाठींच आहे ह्या हिटलरच्या घोषणेचा ह्या योजनेंतच अन्तर्भाव होतो. ह्या योजनेप्रमाणें जर्मन साम्राज्यांतील नागरिकत्वाचें हक्क

फक्त जर्मन आर्यवर्णाच्या लोकांसच देण्यांत येतील, जर्मन नागरिकांवांचून इतरांना सरकारी नोकरी मिळणार नाहीं, अथवा स्वतंत्र व्यापार, उदीम अगर इतर व्यवसाय करून पैसे कमवितां येणार नाहींत. जर्मनींत राहणारे जे लोक आर्य-वर्णाचे नसतील त्या लोकांना परकीय लोकांसाठीं केलेल्या खास कायद्याप्रमाणें वागावें लागेल.

नाझी पक्षाचें हें धोरण ज्यू लोकांचा उत्कर्ष सहन न झाल्यामुळें नाझी पक्षानें स्वीकारलें आहे व वरील धोरणाचा मुख्य रोख ज्यू लोकांच्याच विरुद्ध आहे असें नाझींचे प्रतिपक्षी म्हणतात. प्रतिपक्षीयांच्या ह्या आक्षेपास उत्तर म्हणून ज्यू व नाझी संबंध कशा प्रकारचा आहे तें देणें अप्रस्तुत होणार नाहीं.

हिटलरच्या कार्यक्रमांत ‘ ज्यूंच्या प्रश्नाला ’ प्रामुख्य देण्यांत आलें आहे तें खरें आहे. मध्ययुरोपांतील इतर राष्ट्रांत सुद्धां हा प्रश्न आहे व जर्मनींतील इतर पक्षसुद्धां थोड्या फार प्रमाणांत ज्यूलोकांचा द्वेष करितात. मध्ययुरोपांत लोकांचे युडेन ( Juden ) व निख्ट युडेन ( Nicht juden ) असे दोन भाग कल्पिले आहेत ज्यूंचा नायनाट करण्यासाठीं चालविलेल्या: चळवळीला युडेन फ्राग ( Judenfrage ) असें म्हणतात. ज्यूंच्यावर इतका दांत ठेवण्याला असें कारण सांगण्यांत येतें कीं ज्यूलोकांचें अस्तित्व आर्यांच्या सामाजिक व नैतिक हिताला घातक आहे, शिवाय आर्यसंस्कृतीही त्यांच्या अस्तित्वामुळे नष्ट होण्याचा संभव आहे. ह्या सामान्य विधानापलीकडे ज्यूंचा नायनाट करण्यासाठीं कांहीं सबळ कारण दिसत नाहीं. दुसरें कारण शोधायला गेलें तर तें सांपडण्यासारखें असून थोडें सयुक्तिक आहे असें म्हणतां येईल. इ. स. १९१४ चें युद्ध सुरूं झाल्यानंतर पुष्कळच ज्यू लोक जर्मनींत आले. जर्मनींचें प्रजाजन युद्धांत गुंतल्यामुळें बाहेरून आलेल्या ज्यू लोकांना आपलें हातपाय पसरण्यास चांगलीच संधी मिळाली आणि ह्या संधीचा त्यांनीं भरपूर फायदा घेतला. युद्धकालांतील आणि युद्धानंतर जर्मनीचा मोठा व्यापार ज्यूंच्या

हातांत गेला. त्यांनीं खाद्यपेयांच्या किंमती वाढवून द्रव्यानें स्वतःचीं कोठारें भरलीं; दारिद्र्यांत गांजलेल्या लोकांना जबर व्याजानें पैसे कर्जाऊ देऊन त्यांस बुडविलें. ही व्यापारधंद्याची गोष्ट झाली. इतर बाजूला हीच स्थिति नजरेंत येते. वकीलीचा, वैद्यकीचा अगर शिक्षकाचा धंदा घ्या त्यांत ज्यूंचा निम्म्यापेक्षां अधिक भरणा झालेला दिसतो. घरच्या मालकाला कांहीं न मिळतां घरीं आलेल्या अतिथींनेंच सर्व गिळंकृत केलें असें पाहून कोणत्या मालकास राग येणार नाहीं ? अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळेंच ज्यू लोकांविरुद्ध हांकाटी होण्यास सुरवात झाली व ‘ ज्यू लोकांनीं जर्मनीला बुडविलें, तरुण जर्मन विद्यार्थ्यांना जर्मन इतिहास व संस्कृति विसरून जाण्यास सांगितलें, जर्मनींत साम्यवादासारखीं अनार्य तत्त्वें पसरविण्यास मदत केली, व इतर राष्ट्रांचीं मतें जर्मनीविषयीं कलुशित केली ’ अशी ओरड करण्यास हिटलरनें सुरवात केली. नाझींच्या आंखीव कार्यक्रमाप्रमाणें सर्व ज्यू लोकांना जर्मनींतून हांकून देण्यांत येईल असें नाहीं. सन १९१४ नंतर जर्मनींत आलेल्या ज्यू लोकांविरुद्धच ही चळवळ आहे. ज्या ज्यू लोकांनीं स्वतः युद्धांत शिपाईगिरी केली असेल, अगर ज्यांच्या वडिलांनीं अगर मुलांनीं युद्ध-कालांत जर्मनीला साहाय्य केलें असेल त्यांना ह्या चळवळीपासून उपद्रव होणार नाहीं असें नाझींचें ह्मणणें आहे. नाझींचा ज्यू लोकांसंबंधीचा कार्यक्रम खालीं दर्शविल्याप्रमाणें आहे.

ज्यू लोकांसाठीं एक नोंदणी पुस्तक ठेवण्यांत येईल, त्यांत सर्व ज्यूंनीं आपलीं नांवें नोंदवून घेतलीं पाहिजेत. सरकार दरबारीं ज्यूंना कामकाज लागलें तर त्यांच्या कागदपत्रावर ते युद्धोत्तर जर्मनींत आले असतील तर नुसतें ‘ ज्यू ’ असें लिहिलें पाहिजे, व जर्मनींत जर पूर्वीपासूनच राहात असतील तर ‘ ख्रिश्चन ज्यू ’ असें लिहिलें पाहिजे. जर्मनींत पिढ्यान् पिढ्या राहणाऱ्या ज्यूंनीं जरी १८१२ सालच्या प्रुशिअन फर्मानाप्रमाणें आपला धर्म बदलून ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केला असला तरीही त्यास ज्यू संबोधण्यांत येईल.

युहुदी वैद्याला युहुदींतर रोग्यांना औषधपाणी देतां येणार नाहीं. यहुद्यांनीं रविवारच विश्रांतीचा दिवस ह्मणून धरला पाहिजे. नाणेंबाजारांतील झालेला अगर होणार फेरफार त्यांनीं बाहेर कळवितां कामा नये. हे नियम त्यांनीं मोडल्यास त्यांची मालमिळकत सरकारांत जमा होईल. ज्यू लोकांसाठीं वेगळीं स्नानगृहें उघडण्यांत येतील त्यांच्यासाठीं राखून ठेवलेल्या स्नानगृहांतच त्यांनीं स्नान केलें पाहिजे सार्वजनिक स्नानगृहांत ज्यूनीं स्नान केल्यास त्यांस शिक्षा करण्यांत येईल. त्यांना ख्रिस्तो लोकांचीं नांवें धारण करतां येणार नाहींत. ख्रिश्चन लोकांपेक्षा ज्यू लोकांवर करांचा बोजा दुप्पट राहील.

ज्यू लोकांचें हें पुराण जरी लांबलचक असलें तरी त्याचा सारांश येवढाच आहे कीं, " जर्मनींत केवळ ' आर्य ' लोकच नांदू शकतील, अनार्यांना जर्मनींत मज्जाव आहे. "

* * *

ह्याच शीर्षकाखालीं येणारा तिसरा भाग ह्मणजे जर्मन आर्यवर्णाच्या शुद्धि-विषयींचा होय. ह्या चळवळीचा हेतु जर्मन लोकांच्या मनांत रक्ताच्या शुद्धतेविषयीं जाणीव ( Blutsgefühl ) उत्पन्न करुन देणें हा आहे. माइन काम्फमधील ' मनुष्यजाति आणि वर्ण ' नांवाच्या प्रकरणांत ह्याविषयीं हिटलरनें विचार केला असला तरी ह्या तत्वाचा मुख्य प्रणेता डॉ. रोझेनबर्ग हा आहे. हिटलर ह्मणतो कीं, ' कोल्हा सदा सर्वकाळ कोल्हाच राहणार, बदक तें बदक, व वाघ तो वाघच राहणार. बदक कोल्ह्याशीं अगर कोल्हा बदकाशीं संबंध ठेवणार नाहीं. मांजर व उंदीर ह्यांचा चालत आलेला संबंध नित्य आहे. निसर्गाची योजना ज्यानें त्यानें आपआपल्या जातीशींच संबंध ठेवावा अशी असल्यानें, आणि मानवांतसुद्धां वेगवेगळया गुणधर्मांचे वेगवेगळे वर्ण असल्यानें, एका वर्णाच्या मनुष्यानें दुसऱ्या

वर्णाच्या मनुष्याशीं निसर्ग नियमाविरुद्ध संबंध ठेवण्याची इच्छा कां करावी ? आर्यवर्णांत कोणत्याही प्रकारचा हीणकसपणा आढळून येणार नाहीं, तो मानवजातींतील सर्व वर्णांत श्रेष्ठवर्ण आहे. त्याला प्राप्त झालेली ही पदवी आपण निसर्गविरुद्ध वर्तन करून घालवितां कामा नये '.

हिटलरच्या विचारांस अनुसरून जर्मन आर्य वर्णाची बीजशुद्धि कायम राखण्यासाठीं डॉ. गुस्टाव्ह डारी यानें एक योजना तयार केली आहे. ह्या योजनेप्रमाणें नाझींच्या राजवटींत लग्नसंबंध करण्यास परवाने देण्याची पद्धति पाडण्यांत येईल. असे परवाने शारी-रिक तपासणी करून स्त्री अगर पुरुष लग्नसंबंधास योग्य आहेत असें वाटलें तरच देण्यांत येतील. विवाहसंबंध करण्यासाठीं डॉ. डारीनें स्त्रीजातीचे चार वर्ग कल्पिले आहेत. ह्या चार वर्गांना निरनिराळीं चार चिन्हें देण्यांत येणार असून प्रत्येक स्त्रीनें आपल्या वर्गाचें चिन्ह आपल्या अंगावर दुसऱ्यास नीट दिसेल अशा तऱ्हेनें धारण केलेंच पाहिजे असा नियम करण्यांत येईल.

पहिल्या वर्गांत आर्यवर्णाच्या अत्यंत शुद्ध स्त्रियांची गणना करण्यांत येईल. ज्यांचें रक्तशुद्ध आहे, म्हणजे ज्यांच्या रक्तांत आनार्यांशीं संबंध घडल्यामुळें भेसळ झाली नाहीं, अशा आर्यवर्णाच्या पुरुषांशीं विवाह करण्यास हा वर्ग योग्य होय व ह्या वर्गांतील स्त्रीनें शुद्ध रक्ताच्या आर्यांशींच विवाह केला पाहिजे अशी सक्ती करण्यांत येणार आहे.

स्त्रियांच्या दुसऱ्या वर्गांत सुद्धां शुद्ध रक्ताच्या स्त्रियांचीच गणना होईल. पण ह्या वर्गाच्या स्त्रियांविषयीं थोडीशी शंका असल्यामुळें त्यांना कांहीं काल शास्त्र-ज्ञांच्या नजरेखालीं राहून आपली शुद्धता सिद्ध करून द्यावी लागले. अशा स्त्रियांनीं रक्ताच्या बाबतींतील आपली शुद्धता सिद्ध करून दिल्यावर त्यांना पहिल्या वर्गांत गणण्यांत येईल.

तिसऱ्या वर्गाच्या स्त्रिया ह्मणजे ज्यांच्या रक्तांत थोडीफार भेसळ असण्याचा संभव आहे अशा स्त्रिया होत. अशा स्त्रियांना लग्न करण्याची परवानगी देण्यांत येणार असली तरी त्यांवर निर्बंध घालण्यांत येणार आहेत. अशा स्त्रियांनीं—त्या बुद्धीनें अगर शरीरानें चांगल्या असल्या तरी—खालच्या वर्गांतील पुरुषांशींच विवाह केला पाहिजे, व अशा स्त्रियांशीं विवाह करणारांनीं विवाहाचा परवाना मिळविण्यापूर्वीं स्वतःला ' वांझ ' करून घेतलें पाहिजे.

चवथ्या वर्गांतील स्त्रियांना लग्नसंबंध करण्यास परवानगी नाहीं. ह्या वर्गांत ज्या स्त्रियांचें रक्त शुद्ध नाहीं अशी खात्री आहे अशा स्त्रिया मोडतात.

हल्लींच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांत लोकांवर वर दिल्याप्रमाणें निर्बंध घालणें कितपत सयुक्तिक होईल ही जरी शंका असली तरी नाझींच्या वरील योजनेकडे तें ' ध्येय ' आहे असें समजून बघावयाचें आहे. हिटलरच्या हातांत पूर्ण सत्ता आल्याबरोबर ताबडतोब समाजांतील स्त्रीपुरुषांची वरीलप्रमाणें तो वर्गवारी करील अशांतला भाग नाहीं. असें करणें हिटलरला कदाचित् शक्यही होणार नाहीं. शिवाय हिटलरच्या ह्या योजनेवर टीका करतांना आपणास हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं स्त्रीपुंसंबंधांत लक्ष घालणाऱ्या कांहीं विद्वान् पाश्चिमात्य आयुर्वेदाचार्यांचें सुद्धां ' विवाहोत्तर जबाबदारी पार पाडण्यास विवाहेच्छु स्त्री-पुरुष योग्य असले तरच त्यांस लग्न करण्यास परवानगी द्यावी ' असें मत आहे. सनातन हिंदुसमाजाची सामाजिक घटनासुद्धां तत्त्वाच्या बाबतींत हिटलरला अनुकूल असल्यासारखी दिसते. त्यामुळें हिटलरची योजना ' चिन्त्य ' आहे असें ह्मणण्यास हरकत दिसत नाहीं. आणि यदाकदाचित् हिटलर जर्मनीचा अनभिषिभक्त सम्राट् झाला व त्यानें आपल्या योजनेला चालना देण्याचें ठरविलें तर आपणही केवळ कुतूहलानें हिटलरचा हा प्रयोग कोठवर यशस्वी होतो तें पाहूं.

---

# प्रकरण सातवें

## हिटलर आणि तरुण जर्मनी

तरुण पिढीला जर्मनींत फारच महत्त्व प्राप्त झालें आहे. त्यांना इतकें महत्व प्राप्त होण्याला अर्ध्या शतकापेक्षां अधिक काल चळवळ करावी लागली. ऑस्ट्रियावर सतत होणाऱ्या नेपोलिअनच्या स्वाऱ्या थांबल्यानंतर तरुणांच्या चळवळीला प्रारंभ झाला. नेपोलिअनशी टक्कर देऊन सर्व युरोपखंड टेकीस आला होता. ऑस्ट्रियाची तर अत्यंत विपन्नावस्था झाली होती. ही विपन्नावस्था नाहींशी करण्याचा प्रयत्न गॉटलीब फिख्ट यानें केला. त्यानें तरुणांना हाताशीं धरलें व त्यांच्या साहाय्यानें ऑस्ट्रियन राजकारणाची व सैन्याची घडी बसविली. त्यामुळें फिख्टला जर्मन तरुणांच्या चळवळीचा उत्पादक मानण्यांत येतें.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस तरुणांच्या चळवळीचें नेतृत्व कार्ल फिशर नांवाच्या एका शाळा मास्तराकडे गेलें. विद्यार्थ्यांना ऐतिहासिक महत्वाच्या ठिकाणीं नेऊन त्या ठिकाणीं झालेले ऐतिहासिक बनाव समजावून देण्यास फिशरनें सुरवात केली. अशा शैक्षणिक सहली वारंवार निघत व सहलीवर असलेली सर्वच मुलें आपआपसांत खेळी मेळीनें वागत आणि असें करण्यास त्यांचे शिक्षकही त्यांना उत्तेजन देत. मुलगा थोरा मोठ्याचा असो, अगर गरिबा श्रीमंताचा असो सहलीच्या वेळीं असले भेदभाव मुलें तेव्हांच विसरत. सहलीच्या वेळीं एकत्र आल्यानें मुलांत बंधुभाव उत्पन्न होऊं लागला. गरिबीवर अगर श्रीमंतीवर मनुष्याचा बरें वाईटपणा अवलंबून नसतो, समाजांतील उच्चनीच भाव जन्मावर अवलंबून ठेवणें योग्य नव्हे असें मत तरुणांत फैलावूं लागलें, आणि ह्या मताचा पुरस्कार करून अनेक तरुणांनीं घरांतील वडील धाऱ्या माणसांचा व समाजाचा राग आपल्यावर ओढवून घेतला.

तरुणांची ही चळवळ इ. स. १९१४ मध्यें महायुद्ध सुरू झाल्यामुळें थांबली, व महायुद्धाच्या समाप्तीनंतर पुनः सुरू झाली. तरुणांच्या ह्या चळवळीच्या पुनर्घटनेंत ऐक्याचा अभाव दिसून येऊं लागला. वीस वर्षांच्या वर ज्यांची वयोमर्यादा गेली आहे अशा तरुणांनीं,–ह्मणजे ज्यांना महायुद्धांत भाग घ्यावा लागला होता अशा तरुणांना,–आपला कार्यक्रम साम्यवादास अनुकूल असा आंखला, व ज्यांनीं युद्ध पाहिलें नाहीं अशा तरुणांनीं आपला कार्यक्रम राष्ट्रीयपक्षाच्या कार्यक्रमाबरहुकूम आंखला. राष्ट्रीयपक्षाला व साम्यवादीपक्षाला अनुकूल असें तरुण-संघ निघतांच ' सेंटर ' पक्ष व समाजसत्तावादी पक्ष यांनींही आपआपल्या पक्षाला अनुकूल असें तरुण-संघ स्थापन केलें.

इतर पक्षांना संलग्न असें तरुणांचे संघ निघाल्याबरोबर नाझी पक्षाला जोडून तरुणांचा एक संघ असावा असें हिटलरला वाटलें. तरुणांना आपलेसें करून घेतल्यानेंच आपली चळवळ टिकाऊ होईल असें हिटलरला वाटलें असावें. तरुण लोकांत आपल्या मतांचा प्रचार करण्यांत हिटलरचा आणखीही एक हेतु होता. वायमार येथें घडलेल्या राज्यघटनेप्रमाणें वीस वर्षांवरील प्रत्येक इसमास जर्मन राइखस्टागच्या निवडणुकींत मत देण्याचा अधिकार आहे. आंकडेशास्त्रज्ञांच्या अंदाजाप्रमाणें प्रतिवर्षीं दहा लक्ष जर्मन तरुणांना मतदानाचा हक्क प्राप्त होतो. अशी स्थिति असल्यानें मताधिकार प्राप्त होण्यापूर्वींच तरुणांना आपल्या पक्षांत अडकवून ठेवलेलें असावें असें हिटलरला वाटलें असल्यास नवल नाहीं.

तरुण जर्मनांचें साहाय्य आपणाला पुढें मिळावें ह्या हेतूनें हिटलरनें तरुणांचे संघ स्थापन केले आहेत. ह्या संघांत १४ वर्षांपासून २० वर्षांपर्यंतच्या वयाचे तरुण घेण्यांत येतात. या तरुणांना ' हिटलरचे तरुण ' ( Hitler Jugend ) असें संबोधण्यांत येतें. हिटलरच्या ह्या चळवळीचा उगम इ. स. १९२४ पूर्वींच झाला आहे व दिवसें दिवस तिच्यांत अधिकाधिक तरुण भाग घेत आहेत. इ. स. १९२९ सालीं सर्व ' हिटलर युगेंड ' चें संमेलन भरलें होतें, त्या प्रसंगीं ३५०० तरुणांनीं त्यांत भाग घेतला होता. त्यावेळचा हिटलर-तरुणांचा उत्साह, व

लष्करी शिस्त पाहून हिटलरचें प्रतिपक्षीसुद्धां थक्क झाले असें ह्मणतात. ह्या संमेलनानंतर हिटलर युगेंडची संख्या झपाट्यानें वाढत चालली व पुढें नव्या तरुणांची भरती बंद करण्यापर्यंत पाळी आली. हिटलरच्या ह्या तरुण सेनेकडे कामगारवर्गाच्या वस्तींत जाऊन नाझी पक्षाच्या मतांचा प्रचार करण्याची कामगिरी सोंपविली आहे.

•

हिटलर युगेंडशिवाय नॅशनल सोशालिस्ट शूलेरबंड (National Sozialist Schülerbund ) नांवाचा तरुणांचा आणखी एक संघ आहे, तोही हिटलरला मदत करतो. हा संघ उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठींच काढण्यांत आला आहे. ह्या संघाचा सभासद होण्यापूर्वी प्रत्येक तरुणाला " काया, वाचा, मनेंकरून मी माझ्या शाळेंत नाझी पक्षाच्या मतांचा प्रचार करीन, व माझ्या शाळेंतून नाझीच्या शत्रूंना हांकून देण्यासाठीं शक्य ते प्रयत्न करीन" अशी प्रतिज्ञा करावी लागते. नॅशनल सोशालिस्ट शूलेरबंड इ. स. १९२६ सालीं स्थापन झाला. आज ह्या संघाच्या सभासदांची संख्या एक लक्षावर गेली आहे. जर्मनींत उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थांत १,५०,००० विद्यार्थी असावेत असा अंदाज आहे. त्यापैकीं दोन तृतीयांश विद्यार्थी हिटलरचे अनुयायी आहेत हें लक्षांत घेतलें तर तरुणांची चळवळ ( Jugend Bewegung ) आणि हिटलरची चळवळ ( Hitler Bewegung ) ह्या दोन नसून एकच आहेत असें ह्मटलें तरी चालण्यासारखे आहे.

हें झालें तरुण मुलांविषयीं. तरुण जर्मन मुलीसुद्धां हिटलर पक्षाला अनुकूल असून त्यांनीं हिटलरला मदत करण्यासाठीं ' जर्मन मुलींचा संघ ' नांवाचा एक संघ स्थापन केला आहे. " राजकीय अगर सामाजिक चळवळींत स्त्रियांनीं भाग घेऊं नयें, स्त्रियांचें जग ' चूल आणि मूल ' यांतच भरलेलें आहे " अशी स्त्रियासंबंधीं हिटलरचीं मतें असतांना आधुनिक जर्मन तरुणींनीं हिटलरला सक्रिय साहाय्य करावें हें आश्चर्यच आहे !

कडवेपणा व लष्करी शिस्त हिटलरच्या तरुण अनुयायांत दिसून येतात. स्वपक्षाचें हित साधण्यासाठीं नाझी तरुण कोणतेंही काम करण्यास माघार घेणार नाहीं. सर्व नाझी तरुणांत बंधुभाव वसत असून, स्वपक्षाशीं सर्वजण एकनिष्ठेनें वागतात. ' आधीं स्वपक्षहित व नंतर इतर गोष्टी ' हें त्यांचें ब्रीद वाक्य आहे. नाझी तरुणांच्या चळवळींत धर्मकारणाला थारा नाहीं. ' वैयक्तिक हितापेक्षां समाजाचें हित श्रेष्ठ आहे ' हें तरुणधर्माचें ब्रीदवाक्य आहे.

नाझी तरुणांना वर्णश्रेष्ठतेचें बाळकडू पाजण्यास लहानपणापासूनच सुरवात होते. आर्यवर्ण श्रेष्ठ असल्यानें आर्यांनीं अनार्यांशीं ( ज्यूंशीं ) संबंध ठेऊं नयें अशी बालपणींच नाझी तरुणांना शिकवण मिळते. इतकेंच नव्हें तर एखाद्या जर्मन तरुणाची एखाद्या यहुदी मुलाबरोबर मैत्री असली तर त्याला वाळींत टाकण्याचा प्रयत्न होतो !

नाझी तरुणांच्या नीतिशास्त्रानुसार यच्चयावत् मानवांनीं परस्परांत बंधुभावानें वागावें असें प्रतिपादणारा जगद्वंद्य कवि गटे राष्ट्रद्रोही ठरतो, तर ' वर्णधर्माची ' श्रेष्ठता प्रतिपादणारे शोपेनहार व अर्नस्ट युंगर हे कवि नाझी तरुणापुढें आदर्श म्हणून धरले जातात.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे अगदीं बालपणींच नाझी तत्त्वज्ञानाचा मनावर ठसा उमटवून पुढें तो पुरुष नाझी पक्षाचा कट्टा अनुयायी बनेल अशी तजवीज आधींच करून ठेवण्यासाठीं हिटलरनें नाझी तरुणांची चळवळ सुरू केली आहे.

---

# प्रकरण आठवें

## नाझींचें ‘ गूढ ’ धोरण ( पुढें चालू )

सहाव्या प्रकरणांत ह्मटल्याप्रमाणें जर्मन राष्ट्र हें एक वर्णीराष्ट्र करण्याचा नाझी पक्षाचा उद्देश आहे, व ह्या उद्देशसिद्धीसाठीं नाझी पक्ष निरनिराळी उपाय-योजना करणार आहे. जर्मन राष्ट्र एक वर्णी जरी झालें तरी त्यांत निरनिराळे उद्योगधंद करणारीं माणसें असणारच. त्यांत शेतजमीन नांगरून पिकलेल्या धान्यावर निर्वाह करणारे शेतकरी असतील, मोठमोठ्या जमिनी कुळांना पट्टयानें देऊन आलेल्या उत्पन्नावर चैन करणारे जमीनदारही सांपडतील, मोल मजुरी करून पोट भरणारीं माणसेंही दिसतील, व मजुरांना वेतन देणारे धनिक भांडवल-वाले सुद्धां आढळांत येतील. सर्वां आधीं सर्व प्रजाजनांचे संबंध सलोख्याचे राहावेत, राष्ट्रांतील सर्वांचें इह आणि परहित साधावें अशी सर्व राष्ट्रिकांची इच्छा असणारच. शेवटीं ह्या गोष्टी सुरळीत चालाव्यात ह्मणून त्यांचें नियमन करण्या-साठीं शासनयंत्राची जरूर भासणारच.

नाझींच्या राजवटींत वरील बाबतींत कशी व्यवस्था राहणार आहे तें आपण पाहूं. पण प्रथम आपणाला ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, वरील बाबतीं-संबंधांत नाझीपक्षानें जीं पत्रकें प्रसिद्ध केलीं आहेत तीं सर्व संदिग्ध असल्यामुळें त्यांच्या योजनांची सामान्य रूपरेषा कळण्या पलीकडे अशा पत्रकांचा आपणाला कांहीं उपयोग होत नाहीं. तपशीलाची माहिती पाहिजे असेल तर त्यांच्या प्रत्यक्ष कार्याकडेच आपणाला पाहिलें पाहिजे. शिवाय नाझींची ह्मणून ह्मटलीं जाणारीं मतें मूळचीं दुसऱ्या पक्षांचींही असण्याचा संभव आहे. पण नाझींना अशा उसन-वारीची लाज वाटत नाहीं. त्यांच्या तत्वांचें सार कांहीं तरी देशहिताचें कार्य

करीत राहावें असें असल्यानें, ज्या कार्यक्रमामुळें देशाचें हित होण्याचा संभव असेल असा कोणताही कार्यक्रम नाझी पक्ष आपला कार्यक्रम ह्मणून आंखण्यास व पार पाडण्यास तयार असतो, फरक इतकाच कीं तो आंखण्यांत आणि पार पाडण्यांत 'नाझी पद्धतीचा' अवलंब केला जातो. नाझी पक्षाविषयीं एकानें असें ह्मटलें आहे कीं "घेण्यासारखी असेल अशी प्रत्येक गोष्ट नाझी पक्ष आपल्या पोतडींत भरून ठेवतो, घेण्यासारख्या अशा एखाद्या गोष्टींत जर वाईट, अहितकारक व नाझी पक्षाच्या मूलभूत उद्देशाला बाधक असा भाग असेल तर तेवढा टाकून देऊन त्यांत सुधारणा करण्यास जागा असली तर तेवढी करून नाझी पक्ष ती गोष्ट आत्मसात् करतो. विचार उपयोगी आणि हितपरिणामी असला तर त्या विचाराचें जनकत्व कोणाकडे जातें त्याची चौकशी करण्याचें प्रयोजन नाझी पक्षाला उरत नाहीं. ह्मणून नाझींनीं एखादी कल्पना अगर कार्यक्रमाचा एखादा भाग दुसऱ्या पक्षाच्या कार्यक्रमांतून उचलला आहे असें ज्या वेळीं नाझींचे टीकाकार अगर प्रतिपक्षी ह्मणतात त्यावेळीं त्यांच्या टीकेचा अर्थ नाझी पक्षांत कांहींच वैशिष्ट्य नाहीं असा होत नाहीं; कारण नाझींचें वैशिष्ट्य पुढें उपयोगी पडणारी देशहित-कारक गोष्ट अचूक हुडकून काढून, ती पारखून आत्मसात् करण्यांत व सुधारणा-क्षम गोष्टींत पाहिजे ती सुधारणा करून ती उपयोगांत आणण्यांत आहे."

प्रथम आपण शेती, शेतकरी व जमीनदार यांच्या विषयींचा नाझींचा कार्य-क्रम काय आहे तें पाहूं. नाझींच्या मताप्रमाणें राष्ट्रांतील सर्व शेतजमीनीवर सर-कारचा हक्क आहे. व शेतकरी हा केवळ उपरी आहे. असें असलें तरी नाझी पक्ष हा खाजगी माल मिळकतीविरुद्ध नसल्यानें शेतकऱ्याकडे असलेली शेत जमीन त्याच्या घरांत वंशपरंपरेनें राहील व शेतकऱ्याला जमीनीचा मालक न समजतां त्याला त्याच्याकडे असलेल्या जमीनीच्या तुकड्यावर शेतकी करण्याच्या हक्काचा मालक समजण्यांत येईल.

ही झाली शेतकऱ्यासंबंधीं गोष्ट. आतां जमीनदारांसंबंधीं नाझींचें धोरण काय आहे तें पाहूं. जमीनदारांच्या बाबतींत नाझींचें धोरण मार्क्स वादाला अनुकूल आहे. जमीनदारांविषयींच्या धोरणांत हिटलरला फार जपून वागावें लागत आहे. बऱ्या जमीनदारांनीं आणि कारखानदारांनीं हिटलरला पैसा पुरवून त्याची चळवळ यशस्वी होण्यास मदत केल्यानें त्यांच्या विरुद्ध जाणें हिटलरला कठिण झालें आहे. नाझीपक्षाचा मूळ उद्देश बऱ्या जमीनदारांजवळ असलेली शेतजमीन जमीनदारांना नुकसानभरपाई वगैरे कांहीं न देतां सक्तीनें जप्त करून ती बेकार लोकांस वाटून द्यावयाची असा आहे. असें केल्यानें बेकारी नाहींशी होण्यास पुष्कळ मदत होईल असें नाझींचें ह्मणणें आहे. पण त्याबरोबरच पीक अधिक झाल्यामुळें धान्याच्या किंमती उतरण्याचा संभव असल्यानें तसें न व्हावें म्हणून जर्मनींत खाद्यपेयांची आयात बंदकरण्याचा नाझींचा विचार आहे. असें धोरण आंखण्याचें मुख्य कारण असें आहे कीं जर्मनींतील अवघी ४ टक्के शेतजमीन छोट्या मालकांकडे असून बाकीची राहिलेली ९६ टक्के शेतजमीन मोठमोठ्या जमीनदारांच्या मालकीची आहे. जमीनदार आपल्या मालकीची जमीन खंडानें लावतात व खंडानें जमीन ठेवणाऱ्या कूळांना पिळून काढण्याकडे त्यांचा कल असतो. जमीनदार आणि त्याचें कूळ ह्यांच्यांतील संबंध गुलाम आणि त्याचा मालक यांच्यांतील संबंधा इतकाच स्पृहणीय असतो. कुळांची ही गुलामगिरी नाहींशीं करून त्याला आपल्या जमिनीचा मालक करण्याचा नाझींच्या ह्या धोरणाचा हेतु आहे. पण हें धोरण कोठवर यशस्वी होईल ही शंका आहे. जमीनदारांकडून नाझींनीं पैसे घतले असल्यानें त्यांना त्यांच्या जमिनीवरून हुसकावून लावणें आतां शक्य नाहीं. शिवाय प्रुशिआंतील कांहीं जमीनदारांना त्यांचे हक्क बुडणार नाहींत असें हिटलरनें वचन दिलें आहे असें ह्मणतात. अशा स्थितींत अधिकारारूढ हिटलरला एकच मार्ग उरला आहे आणि तो ह्मणणे जमीनदारांच्या जमिनी विकत घेऊन त्या बेकार वर्गास मशागतीसाठीं देणें हा होय.

इतर उद्योगधंद्यांच्या बाबतींत सुद्धां हिटलरचें धोरण वरीलप्रमाणेंच राहील. मोठे कारखानें व बडे कारखानदार हिटलरला डोळ्यापुढें सुद्धां नकोत. ' एका बड्या कारखान्यांत ५०० मजुरांनीं काम करून पैसे मिळविण्यापेक्षां त्या ५०० जणांनीं तोच धंदा घरीं बसल्या छोट्याप्रमाणावर करून पोटाला मिळविणें अधिक बरें ' असें नाझींचे ह्मणणें आहे असें केल्यानें प्रत्येक जण आपल्या धंद्याचा मालक होईल व मालक आणि मजूर यांतील लढा मिटण्यास पुष्कळशीं मदत होईल. ही योजना एका मनुष्याला घरीं बसल्या चालवितां येईल अशा धंद्याविषयीं झाली, पण ज्या ठिकाणीं एखादें काम मोठ्याप्रमाणावर केल्याशिवाय होणारें नसले तर त्याबाबतींत नाझींची योजना वेगळी आहे. येथें त्यांनीं सोशालिस्टाची उसनवारी करून असें ठरविलें आहे कीं अशा उद्योगधंद्यांच्या बाबतींत खाजगी प्रयत्नानें कोणी कारखानें काढूं नयेत, असल्या प्रकारचें उद्योगधंदे सरकार स्वतः काढील व सध्यां जे अस्तित्वांत असतील ते सुद्धां सरकारी मालकीचे करण्यांत येतील. ह्याप्रमाणें उद्योगधंद्यासंबंधीं नाझी पक्षाचें धोरण आहे. पण हें धोरण प्रत्यक्ष व्यवहारांत उतरविण्याचा ज्या वेळीं प्रसंग येईल त्या वेळीं जमीनदारांच्या बाबतींत जसा ' मधला मार्ग ' स्वीकारण्याची नाझी पक्षाला पाळी येणार आहे. तद्वत्‌च कारखानदारांच्या बाबतींत सुद्धां नाझींना ' मधला मार्ग ' स्वीकारावा लागेल.

आर्थिक धोरणांतील महत्वाचा भाग ह्मणजे भांडवलशाही व सावकारी विषयींचा होय. नाझींच्या धोरणामुळें आंतरराष्ट्रीय सावकारी करणारे सावकार बुडण्यांचा संभव आहे. ह्या बाबतींत नाझी पक्ष व्यक्तीचा नियमच राष्ट्राला लावतो. ज्याप्रमाणें ऋणको व्यक्ति धनकोच्या पायीं बेजार होते व अपरिमित नुकसान सोसून सुद्धां धनकोच्या जाचांतून सुटण्याचा प्रयत्न करते त्याप्रमाणेंच ऋणको राष्ट्र धनको राष्ट्रांच्या पायीं बेजार होतें. व त्याला धनको राष्ट्राच्या पायीं असह्य अपमान सोसण्याची पाळी येते.

व्यापारी भांडवलाच्या ( Das Kapital ) बाबतींत सुद्धां नाझी पक्षाचें मत वरील सारखेंच आहे. भांडवलाचे दोन भाग पाडण्यांत येतात, एक उत्पादक

भांडवल व दुसरें अनुत्पादक अथवा सावकारी भांडवल (Das Leihkapital). नाझींच्या मताप्रमाणें एखाद्या जवळ जर पुष्कळ पैसा असला व त्यानें तो घरेंदारें खरीद करण्यांत उपयोजिला अगर त्याच्या साहाय्यानें एखादा उद्योग धंदा काढला तर चालेल पण जर त्यानें तोच पैसा दुसऱ्या एखाद्यास घरेंखरीदण्यासाठीं अगर उद्योगधंदा काढण्यासाठीं कर्जाऊ दिला तर तें मात्र चालणार नाहीं. नाझी राजवटींत जो कोणी अयोग्य नाफाबाजीचा, सट्टेबाजीचा अगर व्याजबाजीचा धंदा करील त्याला देहांत प्रायश्चित्तावांचून दुसरें प्रायश्चित्त नाहीं !

मागें ह्मटल्याप्रमाणें नाझींच्या धोरणाविषयीं अधिक तपशीलवार माहिती मिळण्याला साधन नाहीं, जी थोडी फार माहिती मिळते तीवरून नाझींच्या धोरणाविषयीं थोडक्यांत कल्पना येईल इतकी माहिती वर दिली आहे. आतां नाझींच्या शासन विषयच काय कल्पना आहेत तें पाहूं.

शासनयंत्र कसें असावें ह्याविषयीं हिटलरनें फारसा विचार केलेला नाहीं. राज्यशासन नीट असणें हें सरकारच्या घटनेवर अवलंबून नसून तें एका व्यक्तीच्या बुद्धिमत्तेवर आणि कार्यक्षमतेवर अवलंबून असतें असें हिटलरचें मत आहे. हिटलरच्या ह्या मतावरून नाझीराजवटींत जर्मन सरकारची घटना कशी असेल ह्याविषयीं कल्पना येते. शिवाय नाझी धोरणामुळें सामाजिक व्यवस्था आमूल बदलणार असल्यामुळें ती बदलण्याला क्षम असेंच नाझींचें शासनयंत्र असणार आणि सध्यांच्या नाझी पक्षसंघटनेकडे पाहिलें ह्मणजे सध्यांच्या परिस्थि-तींत सर्वाधिकारित्वासारखीच ( Dictatorship ) शासन पद्धति नाझी राज-वटींत अमलांत येईल. नाझी राजवटींत पक्षोपक्ष असणार नाहींत राजकीयपक्ष-भेदाचें नाझींना वावडे आहे. एखादी विशिष्ट सुधारणा करण्याचें डोक्यांत घेऊन तिच्यासाठीं पक्ष काढून ती अमलांत आणण्याचा प्रयत्न करणें नाझींना पसंत नाहीं. नाझींच्या मताप्रमाणें" ज्यांच्या ज्यांच्या मनांत राष्ट्राचें हित व्हावें, राष्ट्र सुखी व्हावें व त्याची प्रगती व्हावी असें असेल त्या सर्वांचा पक्ष एकच. त्या

सर्वांनीं आपलें ध्येय डोळ्यांपुढें ठेऊन संघटित कार्य केलें तर लोकांना तेव्हांच सुख लागेल. लोकांच्या हितार्चें जें जें असेल तें तें करावयाचें, माझेंच खरें इतरांचें खोटें असें वाद घालीत बसावयाचें नाहीं असें नाझीचें तत्व आहे प्रतिपक्षी असूंच द्यावयाचा नाहीं, सर्वांचें हित राष्ट्राच्या हितांत आहे, ज्या ज्या गोष्टी करावयाच्या त्या राष्ट्रहिताच्याच करावयाच्या, राष्ट्रहिताविरुद्ध कोणतीहि गोष्ट होऊं द्यावयाची नाहीं. " हें नाझींचें ब्रीद आहे.

आतां सांस्कृतिक विनयनासंबधीं लिहावयाचें राहिलें तेवढें लिहून हें प्रकरण आटोपतें घेऊं. जर्मनराष्ट्राची आर्य संस्कृति कायम टिकावी व तिच्या श्रेष्ठपणाला कमीपणा येऊन तिला हीनता येऊं नये ह्मणून नाझींनीं एक योजना आंखली आहे. ह्या योजनेप्रमाणें सर्वराष्ट्राला सक्तीचें शारीरिक व लष्करी शिक्षण देण्यांत येणार आहे तेवढ्यासाठीं खर्च सरकार करील व खेळण्यासाठीं मोठ मोठीं मैदानें तयार करण्याची व्यवस्था करील. आर्यसंस्कृतीचें श्रेष्ठत्व लोकांच्या मनावर ठसावें ह्मणून त्यांना लहानपणापासूनच तसें शिक्षण देण्यांत येईल. अनार्य तत्वें प्रदिपादिलीं जाऊं नयेत ह्मणून वर्तमानपत्रें, नाटकें, चित्रपट, बोलपट वगैरेंवर सक्त नियंत्रण ठेवण्यांत येईल. ह्या सर्व गोष्टी नीट करतां याव्यात ह्मणून हल्लींची संयुक्त संस्थान पद्धति ( Federation ) नाहींशी करून त्या ठिकाणीं सर्व जर्मनीसाठीं एकच सरकार ह्मणजे राष्ट्रीय सरकार स्थापन करण्यांत येईल.

---

# प्रकरण नववें

## वाढत्या शक्तीचें प्रदर्शन

तिसऱ्या प्रकरणांत हिटलरच्या चरित्राची इ. स. १९२४ पर्यंतची रूपरेखा दिली आहे. आतां हिटलरचें आजपर्यंतचें चरित्र द्यावयाचें, म्हणजे जर्मनींत घडणाऱ्या घडामोडींची आज तागाईतची माहिती देणें होय.

बव्हेरिअन सरकार हस्तगत करण्यासाठीं हिटलरनें आपल्या तुफान फौजेच्या साहाय्यानें चढाई केली, पण ती अयशस्वी होऊन हिटलरला सहा महिने तुरुंगवास भोगावा लागला. हिटलर तुरुंगांतून बाहेर पडला तेव्हां जर्मनीचें औद्योगिक पुनरुज्जीवन होण्यास सुरवात झाली होती. अमेरिकन व्यापाऱ्यांनीं जर्मनीस द्रव्य-साहाय्य केल्यामुळें मार्क नाणें स्थिरपद झालें होतें. जर्मनीचें औद्योगिक पुनरुज्जीवन करून जर्मनीला श्रेष्ठपदावर नेण्यासाठीं सर्व पक्ष झटत असल्यानें राजकारणाकडे लक्ष देण्यास कोणास अवसर नव्हता. त्यामुळें सुटून आल्यानंतर हिटलरची सर्वत्र उपेक्षा होऊं लागली. बव्हेरिआनें हिटलरची चळवळ सुरू झालेली पाहिली व ती यशस्वी होण्यासाठीं अथपासून मदत केली, पण आतां तोच बव्हेरिआ हिटलरवर उलटतो कीं काय, अशी भीति उत्पन्न झाली होती. हिटलर तुरुंगांत असतांना नाझींचे बहुतेक छोटे मोठे पुढारी ' हिटलरचें नांव सोडा; त्याला नाझी पक्षांतून हांकलून द्या ' अशा गर्जना करीत होते. पोहनर, लुडेंडॉर्फ, क्रॉबेल, ऱ्होम आदि हिटलरचें सर्व मदतनीस उदासीन होते. डॉ० पोहनर तर राष्ट्रीय पक्षाला मिळून त्यानें नाझी पक्षीयांना राष्ट्रीय पक्षांत ओढण्याची खटपट चालविली होती. इ. स. १९२४ च्या डिसेंम्बर महिन्यांत झालेल्या राइखस्टागच्या निवडणुकींत नाझी

पक्षाला अवघ्या १४ च जागा काबीज करतां आल्या. निवडणुकी पूर्वी नाझींचे ३२ सभासद राइखस्टागमध्यें बसत असत, हें लक्षांत घेतां नाझींच्या झालेल्या पिछेहाटीची कल्पना येईल. शिवाय निवडून आलेल्या १४ सभासदांत सुद्धां हिटलरचें पुढारीपण मानणारे अवघे ४ सभासद होते.

अशा तऱ्हेनें सर्व बाजूंनीं प्रतिकूल परिस्थिति असतांही हिटलरनें नाझी पक्ष पुनरुज्जीवित करण्यासाठीं नेटानें सुरुवात केली. ह्या कामीं ग्रेगर स्ट्रासर व ओट्टो स्ट्रासर या स्ट्रासर बंधूंनीं त्याला फार चांगली मदत केली. हिटलर तुरुंगांत असतांना नाझी पक्षांत धुगधुगी कायम ठेवण्याकरितां त्यांना फार श्रम घ्यावे लागले, आणि तेवढ्यासाठीं स्वतःचें दुकान विकून पैसे उभारण्यासुद्धां त्यानें कमी केलें नाहीं. स्ट्रासरची मतें सोशालिस्ट व कम्युनिस्ट पक्षांना थोडीशीं अनुकूल असल्यानें असला कार्यप्रवण पुरुष आपल्यांत असलेला बरा असें वाटून त्या पक्षांनीं त्याला मोठमोठीं आमिषेंही दाखविलीं, पण स्ट्रासरनें आपलें इमान सोडलें नाहीं. हिटलरच्या भोंवती जरी थोडेसेंच अनुयायी होते तरी स्ट्रासरप्रमाणें सर्व एकनिष्ठ असल्यानें त्यांच्या जोरावर आपण फक्त तेव्हांच जिंकु अशी हिटलरला खात्री होती, व ह्या खात्रीवरच नाझीपक्ष पुनः पांच वर्षांचें आंत पूर्वस्थितीला नेऊन सोडतो असें फोकिश ब्योबाख्टर मधून त्यानें जाहीर केलें.

इ. स. १९२५ मध्यें नाझीपक्षाची सभा हॅनोव्हर मुक्कामीं भरली. ह्या सभेला हिटलर स्वतः हजर नव्हता. हिटलरची बाजू गॉट्फ्रीड फेडर व ग्रेगर स्ट्रासर यांनीं सभेपुढें मांडली व हिटलरलाच नाझी पक्षाचा सर्वाधिकारी नेमण्यांत कशी सयुक्तिकता आहे तें विशद करण्याचा प्रयत्न केला. पण सभेंत हिटलर कंपूला जय मिळाला नाहीं.

ह्याच सुमारास दक्षिण टायरोलवर पुस्तक लिहून इटालिअन फासिस्ट पक्षाची सहानुभूति संपादण्याचा हिटलरनें प्रयत्न केला. ह्या पुस्तकामुळ हिटलरच्या शत्रूंस

त्याच्यावर टीका करण्यास चांगलेंच फावलें. दक्षिण टायरोलवर जर्मनी फार दिवसांपासून हक्क सांगत असूनसुद्धां तो प्रदेश इटलीला सोंपविण्यास हरकत नाहीं असें हिटलरनें प्रतिपादिलें. ' फासिस्ट पक्षाची सहानुभूति मिळवण्यासाठीं, व त्यांच्याकडून द्रव्यसाहाय्य मिळण्यासाठीं हा हिटलरचा प्रयत्न आहे ' असें त्याचे प्रतिपक्षी ह्मणूं लागले. उलट हिटलरचें असें ह्मणणें होतें कीं, ' दक्षिण टायरोलचा प्रश्न ज्यू लोकांनीं उपस्थित केला आहे. त्यांत जर्मनीचा कांहीं संबंध नाहीं. '

प्रतिपक्षावर हल्ला करतांना अगर आपल्या मतांचा प्रचार करतांना स्वतः हिटलर फारच खबरदारी घेऊं लागला. आपल्याकडून कायद्याच्या मर्यादेचें उल्लंघन होऊं नये ह्मणून त्यानें आपली भाषा थोडी सौम्य ठेवली. अशा प्रकारची काळजी घेण्यास हिटलरला एकच कारण होतें. तें ह्मणजे प्रतिपक्षीयांनीं उचलबांगडी करून कोर्टाकरवीं आपणाला पुनः तुरुंगांत डांबू नये हें होय. कारण हिटलर जर पुनः तुरुंगांत जाता तर त्याच्या पक्षाचा शेवट होण्यास फारसा वेळ लागला नसता. पण हिटलरला करतां न येण्यासारखें हें काम डॉ. गोबेल्ससारखे त्याचें अनुयायी करीत असत. अशा तऱ्हेनें एक वर्ष निघून गेलें. बॅम्बर्ग मुक्कामीं नाझींची दुसरी सभा भरली. ह्या सभेंत हिटलर विजयी झाला व पुनः तो नाझीपक्षाचा सर्वाधिकारी बनला.

बॅम्बर्ग कॉंग्रेसमध्यें हिटलरला जय मिळाल्यावर त्याचें बळ हळूं हळूं वाढत चाललें. ' पूर्वीसारखा पुंडावा माजवून आपल्याला कांहींही मिळणें शक्य नाहीं, आपला विजय झाला तर तो सनदशीर मार्गानींच होणें शक्य आहे, ' हें हिटलरला कळून चुकलें. त्यामुळें आपल्या पक्षाच्या मतांचा प्रचार करण्यासाठीं त्यानें व्याख्यानांचे अनेक दौरे काढले, व पुष्कळ लोकांना आपल्या पक्षाचें सभासद बनविलें. जर्मनींत सर्व संस्थानांतून नाझीपक्ष दृढमूल झाला असला तरी बर्लिन भागांत नाझींची सरशी नव्हती, म्हणून तेथील चळवळ सुयंत्रित करण्यासाठीं

८१०५७

डॉ. गोबेल्सची नेमणूक करण्यांत आली. त्यानें एका वर्षाच्या आंतच बर्लिनमध्यें नाझीपक्ष स्थिरपद केला.

पुंडावा माजविण्याचें रद्द झाल्यामुळें तुफान फौज स्वस्थच होती. लोकांच्या डोळयांपुढें नाझी पक्ष सतत राहावा म्हणून तुफान फौजेचे निरनिराळे कार्यक्रम करण्यास सुरवात झाली. लष्करी कवाइत व मिरवणुकी चालूंच होत्या, तशांत फौजेनें रस्त्यांत भेटेल त्या प्रतिपक्षीयांस ठोकण्याची कामगिरी आपल्यावर ओढून घेतली. ह्या बाबतींत हिटलर म्हणतो कीं, ' अशा तऱ्हेनें खून व मारामाऱ्या करण्याला मी माझ्या खाकी डगलेवाल्यांना केव्हांच सांगितलें नाहीं. त्यांच्यावर जर कोणीं तुटून पडलें तर योग्य त्या उपायांनीं तुम्ही आत्मसंरक्षण करा, असा माझा त्यांना हुकूम आहे. उलट जो कोणी पिस्तुलें अगर बंदुकी वापरील त्याची नाझी पक्षांतून हाकालपट्टी होईल असें माझें फर्मान आहे. ज्या मारामाऱ्या होतात त्या आमच्या फौजेंतील लोकांकडून होत नाहींत, आमच्यासारखा पोषाख करून आमचे शत्रूच मारामाऱ्या करून आमची बदनामी करण्याचा प्रयत्न करतात ! ' हिटलरनें जरी असें म्हटलें असलें तरी त्याच्या पक्षाचे लोक मारामाऱ्या करीत असतात हें निश्चित आहे. मारामारीसाठीं वापरण्यांत येणारी नाझी शस्त्रें–रबरी काठ्या व पोलादी लवचीक सळया–दिसण्यांत जरी निरुपद्रवी दिसलीं तरी असलें शस्त्र डोक्यांत बसलें तर प्रतिपक्षास जबर दुखापत झाल्यावांचून राहात नाहीं. मारामाऱ्या करण्यांत नाझी पक्षाचा काय किंवा कम्युनिस्ट पक्षाचा काय हेतु एकच आहे. तो म्हणजे प्रतिपक्षाचें संख्याबल कमी करणें हा होय. पण ह्या उपायानें प्रतिपक्षाचें संख्याबल कमी होण्याला कितपत मदत होते याविषयीं शंकाच आहे.

नाझी पक्ष एकीकडे मारामाऱ्या करीत असला तरी दुसरीकडे नाझी पुढाऱ्यांची व्याख्यानबाजी चालूंच होती. नाझी सभासद राइखस्टागच्या निवडणुकीस

उभे राहात, कांहीं निवडूनही येत, व राइखस्टागमधील नाझी सभासद स्व-पक्षाच्या मतानुवर्ती बिलें पास करून घेण्याची खटपट करीत. राइखस्टागमध्यें नाझींचे पुरेसे सभासद नसल्यानें ह्या कामीं त्यांना फारसें यश आलें नाहीं. सन १९२७ सालीं जर्मन: राष्ट्राच्या अध्यक्षपदासाठीं झालेल्या निवडणुकींत हिंडेन्बुर्गला प्रतिस्पर्धी ह्मणून एका नाझोस उभें करण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. राइखस्टागच्या बाहेरूनसुद्धां राष्ट्रीय पक्षाशीं सहकार्य करून युद्धकर्ज नाकारण्या-साठीं, व व्हेर्सायचा तह रद्द करण्यासाठीं प्लेबिसाइट, रेफरेंडम वगैरे मागण्याची त्यांनीं खटपट केली. एकदोनदां ह्या विषयांवर प्लेबिसाइटही घेण्यांत आला पण त्यांत नाझींचा पराभव झाला. त्यामुळें नाझी पक्ष हा एक विजिगीषु पक्ष आहे असें अधिकारारूढ पक्षांस वाटलें नाहीं. पण लवकरच ' कुत्र्याच्या चाव्यापेक्षां त्याचें भुंकणेंच अधिक परिणामकारक आहे ' असें दृश्य जगाला पाहावयाचें होतें.

सन १९२४ सालीं राज्यतृष्णेच्या हांवेनें नाझींनीं जी उडी घेतली ती अंधकारांत पडली. त्यानंतर सन १९२९ पर्यंत त्यांना प्रकाश असा दिसलाच नाहीं .इ. स. १९२९ मध्यें मात्र प्रकाश किरणें अस्पष्ट दिसूं लागलीं. ह्यासालीं एका संस्थानाच्या राज्यकारभारांत नाझी पक्षाचा पहिल्या प्रथम शिरकाव झाला. थुरिंगिया संस्थानाच्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकी झाल्या त्यांत नाझी पक्षाला बऱ्याचशा जागा पटकावतां आल्यामुळें डॉ० फ्रिक् ह्या हिटलरच्या साहा-य्यकास थुरिंगियाच्या गृहमंत्र्याची व शिक्षणमंत्र्याची जागा देण्यांत आली. 'अल्पारंभः क्षेमकरः' असें ह्मणत ह्मणत डॉ० फ्रिक्नें आपला कारभार नाझी पद्ध-तीस अनुसरून हांकण्यास सुरवात केली. थुरिंगियाच्या प्रधानमण्डळांत असतांना डॉ० फ्रिकनें हिटलरला जर्मननागरिगत्वाचे हक्क दिले. आतांपर्यंत हिटलर जर्मन राष्ट्राचा नागरिक नव्हता ह्मणून त्याला जर्मनींतील कोठल्याही निवडणुकींत भाग घेतां येत नसे, पण त्याला फ्रिक्नें जर्मन नागरिक करून घेतल्यामुळें सन १९३२

सालीं जर्मन राष्ट्राच्या अध्यक्षपदासाठीं झालेल्या निवडणुकींत हिंडेन्बुर्गचा प्रति-स्पर्धी ह्मणून उभे राहतां आलें. डॉ० फ्रिक्‌कडे गृहमंत्रीपद १४ महिन्यांपेक्षां अधिक काळ टिकूं शकलें नाहीं. गृहमंत्री असतांना त्यानें सर्व पक्षांना दुखविलें; थुरिंगियांतील सर्व शाळांतून त्यानें नाझी पक्षाला अनुकूल असें राष्ट्रगीत सुरू केलें. त्यांत सोशालिस्ट व कम्युनिस्ट यांनीं विश्वासघात करून जर्मन राष्ट्राचा नाश केला असें पर्यायानें सूचित केलें असल्यानें लाईप्झिग येथील जर्मन वरिष्ठ कोर्टानें तें बंद करण्यास भाग पाडलें. रेमार्कचें 'पश्चिम अघाडीवर सामसूम' ( All Quiet on Western Front ) हें पुस्तक शाळा कॉलेजांच्या लायब्ररींत घेऊं नये असें फ्रिकनें फर्मान काढलें व त्याच पुस्तकावर एक चलच्चित्रपट आधारला होता त्याच्या विरुद्ध प्रचंड चळवळ करून तो बंद करण्यास त्यानें भाग पाडलें. या कारणांनीं ता. १ एप्रिल १९३१ रोजीं थुरिंगियाच्या लोकसभेंत त्याच्या विरुद्ध निंदाव्यंजक ठराव पास झाल्यानें त्याला आपल्या पदाचा राजीनामा देणें भाग पडलें.

ता. १४ सप्टेंबर १९३० रोजीं राइखस्टागची पुनः सार्वत्रिक निवडणूक झाली. तींत नाझी पक्षाला अनपेक्षित यश मिळालें. ह्या निवडणुकींत आपल्याला ६०–७० पेक्षां अधिक जागा मिळावयाच्या नाहींत असें नाझी पक्षाच्या पुढा-ऱ्यांना वाटत होतें. पण निवडणुकीचा निकाल बाहेर पडला त्यावेळीं १०७ नाझी उमेदवार यशस्वी झाल्याचें पाहून नाझी पक्षांत सर्वत्र आनंदीआनंद दिसूं लागला. असें अपूर्व यश मिळालें असतांही प्रधान मंडळांत अगर राज्यकारभारांत भाग घेण्याचें हिटलरनें नाकारलें. राइखस्टाग भरली त्या दिवशीं सर्व नाझींनीं हिट-लरला पुढें करून बँडच्या तालासुरांत लष्करी शिस्तीनें प्रवेश केला व सभा सुरू झाल्याबरोबर सर्व नाझी सभासद सभागृहांतून निघून गेले.

या निवडणुकीनंतर डॉ. ब्रूनिंग जर्मनीचा चँन्सेलर झाला. त्यानें हिटलरला बोलावून 'नाझीपक्षाचें सहकार्य मिळणें शक्य आहे काय' असें विचारलें.

या विषयावर त्यांचें पुष्कळच बोलणें झालें. पण त्याचा शेवट मात्र हिटलरनें नकार भरण्यांतच झाला. नाझींचें सहकार्य आपणास मिळत नाहीं असें दिसल्यावर डॉ. ब्रूनिंगनें अध्यक्ष फॉन् हिंडेन्बुर्ग कडून फर्मान काढवून त्या अन्वयें आपणाकडे जवळ जवळ सर्व अधिकार घेतलें. हिटलरची सरकारविरुद्ध जोराची चळवळ चालूच होती. जर्मनीची आर्थिकदशा पुन: खालावूं लागली होती. जागतिक मंदी जर्मनीला फारच भोंवली. यामुळें ब्रूनिंग अगदीं बेजार झाला. आर्थिक हलाखीमुळें युद्धकर्जाचा पुढील हप्ता जर्मनी देणार नाहीं, असें ब्रूनिगनें जाहीर केलें. त्यामुळें दोस्तराष्ट्रांचें धाबें दणाणलें व त्यांनींही ओरड करून अमेरिकेकडून एक वर्ष पावेतों कर्जफेडीची सहकुबी मिळविली. जर्मनीच्या आर्थिक स्थितीचें समालोचन करण्यासाठीं दोस्तराष्ट्रांनीं एक समिति पाठविली. या समितीनेंही जर्मन सरकारच्या म्हणण्यास दुजोरा देऊन पुढेंही जर्मनी कर्ज फेडूं शकेल अगर नाहीं याची शंकाच आहे असा आपला अभिप्राय व्यक्त केला. युद्धकर्जांतून ब्रूनिंग डोकें वर काढतो न काढतो तों नाझींच्या चळवळीनें फार उग्र स्वरूप धारण केल्याचें दिसलें. कम्युनिस्ट व नाझी तुफान फौजेतील पाईक यांत रोज मारामाऱ्या होऊं लागल्या. तें बंद करण्यासाठीं ब्रूनिंगनें राष्ट्राध्यक्षाकरवीं आणखी फर्मानें काढून नाझींच्या तुफान फौजेला त्यानें बेकायदा ठरविलें. कोणीही पक्षविशिष्ट पोशाख घालून व हातांत काठ्या लाठ्या घेऊन हिंडूं नये असें त्यानें ठरविलें. वर्तमानपत्रें व सार्वजनिक सभा यांवरही त्यानें कडक निर्बंध घातले. शिवाय जमाखर्चाची तोंडमिळवणी करण्यासाठीं त्यानें जनतेवरील कर्जाच्या बोजांत आणखी भर टाकली. या सर्व गोष्टींमुळें ब्रूनिंग जनतेला अप्रिय झाला. पण त्याच्या अप्रियतेत आणखी भर पडण्यापूर्वींच त्यानें प्रशिअन जमिनदारांच्या जमिनी घेऊन त्या बेकार लोकांस वाटण्यासाठीं तयार केलेल्या त्याच्या योजनेच्या बाबतींत त्याचा राष्ट्राध्यक्ष हिंडेन्बुर्ग याच्याशीं बेबनाव झाला व त्यामुळें त्याला चॅन्सेलर पदाचा राजीनामा द्यावा लागला.

दरम्यान हिंडेन्बुर्गची अध्यक्षपदाची मुदत संपल्यामुळें मार्च १९३२ मध्यें पुनः निवडणूक झाली. निवडणुकीपूर्वी हिंडेन्बुर्ग विनविरोध निवडून यावा ह्मणून ब्रूनिंगनें हिटलरला पाचारण करून ' तूं निवडणुकीस उभा राहूं नकोस ' असें विनविलें, पण हिटलरला आपलें बळ अजमावयाचें असल्यानें त्यानें ब्रूनिंगच्या विनंतीस मान्यता दिली नाहीं. ता. १३ मार्च रोजीं निवडणूक झाली. त्यांत हिंडेन्बुर्गला १,८६,६१,७३६ मतें मिळालीं व हिटलरला १,१३,२८,५७१ मतें मिळून तो दुसरा आला. इतर उमेदवारांना पडलेल्या मतांच्या बेरजेपेक्षां हिंडेन्बुर्गला जास्त मतें पडलीं नाहींत ह्मणून अध्यक्षपदासाठीं ता. १० एप्रिल रोजीं पुनः निवडणूक झाली. दुसऱ्या निवडणुकीला पडलेल्या उमेदवारांच्या मतांच्या बेरजेहून अधिक मतें मिळालीं पाहिजेत असा नियम नसतांही हिंडेन्बुर्गला मिळालेलीं मतें अधिक आहेत असें दिसून येईल. त्यांत त्याला १,९३,५९,६४२, हिटलरला १,३४,१७,४६० व थालमानला ( कम्युनिस्ट ) ३७,०६,३३८ मतें मिळालीं आहेत. या निवडणुकीमुळें जगापुढें आपल्या वाढत्या शक्तीचें प्रदर्शन करावयास मिळालें येवढाच हिटलरला फायदा झाला.

---

# प्रकरण दहावें

## जर्मनीचा सूत्रचालक

ब्रूनिंगनें मे महिन्यांत राजीनामा दिल्यावर हिंडेन्बुर्गनें फॉन् पापन यांस चँन्सेलरपद दिलें. त्यानें राइखस्टाग बरखास्त करण्याचें ठरवून तसें अध्यक्षीय फर्मानही काढविलें व राइखस्टागच्या फेर निवडणुकी ३१ जुलै १९३२ रोजीं होतील असें जाहीर केलें. जुलैमध्यें होणाऱ्या निवडणुकींत आपल्या पक्षास बहुमत मिळावें ह्मणून पापननें पुष्कळ खटपट केली. त्यामानानें त्याला फारच थोडें यश आलें. त्या दिवशीं झालेल्या निवडणुकींत नाझींना प्रचंड विजय मिळाला. एकंदर साडेतीन कोटीहून अधिक मदतदारांनीं आपलीं मतें निवडणुकीच्या वेळीं नोंदलीं. त्यापैकीं सवाकोटीहून थोडीशी अधिकच मतें नाझींना मिळून त्यांना राइखस्टागमध्यें २३० जागा मिळाल्या. जर्मनींत लोकशाही सुरू झाल्यापासून एकाच पक्षाला इतक्या जागा कधींच मिळाल्या नव्हत्या. त्यामुळें निवडणुकी झाल्यावरोबर राइखस्टागमधील सर्वांत मोठ्या पक्षाचा नेता ह्मणून पापननें सहकार्यासाठीं आपला हात हिटलरपुढें पसरला. पण तो त्यानें झिडकारला. हिंडेन्बुर्गनेंही हिटलरची भेट घेतली; त्यांत हिटलरनें हिंडेन्बुर्गला 'रोमवरील हल्ला यशस्वी झाल्यावर मुसोलिनीनें जे जे अधिकार गाजवले तितके सर्व गाजविण्याची सत्ता तुह्मी मला देत असला तर मी प्रधानमंडळ बनविण्यास तयार आहे ' असें सांगितल्याचें बाहेर आलें आहे. हिटलरची ही मागणी हिंडेन्बुर्गनें अमान्य केली व फॉन् पापन यासच राज्यकारभार पुढें हांकण्यास त्यानें सांगितलें.

ता. १२ सप्टेंबर रोजीं नव्या राइखस्टागची पहिली बैठक भरली. सुरवातीला नाझी पक्षीय कॅप्टन गोअरिंग हा सभापतीच्या जागेसाठीं निवडला गेला. या

सभेंत आपला औद्योगिक व आर्थिक कार्यक्रम मांडण्याचा चॅन्सेलर पापन याचा विचार होता पण कम्युनिस्ट पुढारी अर्नेस्ट ट्रोलर एकदम बोलावयास उठला व त्यानें सरकार विरुद्ध निंदाव्यंजक ठराव मांडला. या ठरावास सरकारकडून हरकत घेण्यांत आली. शेवटीं भवति न भवति होऊन राइखस्टागमधील नाझींचा पुढारी डॉ. फ्रिक् याच्या सूचनेवरून सर्वपक्षांस विचार करतां यावा म्हणून अर्धा तासभर राइखस्टागची बैठक तहकूब ठेवण्यांत आली. अर्धातासानंतर सर्व सभासद आपआपल्या जागेवर येऊन वरील्यावर ठरावावर मतें घेण्याचें ठरलें. या अर्ध्या तासांत हिटलरशीं विचार विनिमय करून नाझी पक्षीयांनीं ठरावाला पाठिंबा देण्याचें ठरविलें आहे असें दिसून येतांच फॉन् पापन उठला व त्यानें राइखस्टाग बरखास्त केल्याचें अध्यक्षीय फर्मान सभापतीच्या टेबलावर ठेवलें. असें असतांही राइखस्टागनें ५१३ विरुद्ध ३२ मतांनीं सरकारवरील अविश्वासाचा ठराव पास केला. या ठरावाच्या कायदेशीरपणा विषयीं पुष्कळ चर्चा झाली, पण विरोधी पक्षांना त्या पासून कांहीं फायदा झाला नाहीं. फॉन् पापननें अध्यक्षीय फर्मानांच्या साहाय्यानें राज्यकारभार करणें अबाधित ठेवलें, व ता. ६ नोव्हेंबर रोजीं राइखस्टागच्या पुनः निवडणुकी होतील असें त्यानें जाहीर केलें.

नोव्हेंबरमध्यें होणाऱ्या निवडणुकींत जुलैंत झालेल्या निवडणुकीइतकें मोठें यश हिटलरला मिळणें कठिण होतें. त्याच्याच पक्षांतील कांहीं पुढारी त्याच्यावर नाराज झाले होते. ' दिलेत तर सर्व द्या, नाहीं तर कांहींच नको ' हें हिटलरचें धोरण त्यांना पसंत नव्हतें. त्यांचें म्हणणें असें कीं सध्यां होईल तेवढा शिरकाव प्रधानमंडळात करून घ्यावा व एकदां शिरकाव झाला म्हणजे इतरांना बाजूस सारून आपण सर्वाधिकार हाता घ्यावेत. ह्या विचारसरणीचा पुरस्कर्ता ग्रेगर स्ट्रासर होता, पण डॉ. गोबेल्सचा अशा विचारसरणीस विरोध असल्यामुळें स्ट्रासरनें नाझीपक्षांतून अंग काढून घतलें.

अंतर्गत बेबनावाशिवाय आणखीही कांहीं गोष्टी हिटलरला मारक होणार होत्या. हिटलरच्या कार्यक्रमापैकीं कांहीं भाग पापननें आपला म्हणून अमलांत

आणण्यास सुरवात केली होती. त्यानें नव्या तऱ्हेचीं बेडर जहाजें बांधण्यास मंजुरी दिली, तरुणांसाठीं शारीरिक शिक्षण सक्तीचें केलें, त्यांना उघड्या मैदानांत खेळता यावें म्हणून सरकारी खर्चानें जमिनी खरीद केल्या, या व इतर अशाच गोष्टी त्यानें हिटलरचें बळ कमी करण्याच्या इच्छेनें केल्या. त्यामुळें ६ नोव्हेंबर रोजीं झालेल्या निवडणुकींत हिटलर पक्षाचे कमी सभासद निवडून आले. खालीं दिलेल्या आंकड्यावरून निरनिराळ्या पक्षांच्या मतांच्या व राईखस्टाग मधील सभासदांच्या संख्येंत कसा चढ उतार झाला तें कळून येईल.

## मत नोंदणी

| पक्षाचें नांव | ३१ जुलै १९३२ ची निवडणूक | ६ नोव्हेंबर १९३२ ची निवडणूक | |
|---|---|---|---|
| नाझी पक्ष | १, ३७, ३२, ७७९ | १, १७, १३, ००० | अंदाजे |
| राष्ट्रीय पक्ष | २१, ७२, ९४१ | २९, ५२, ००० | ,, |
| सेंटर पक्ष | ४५, ८६, ५०५ | ४२, २८, ००० | ,, |
| बव्हेरिअन लोक पक्ष | ११, ९०, ४५३ | १०, ८०, ·०० | ,, |
| सोशालिस्ट पक्ष | ७९, ५१, २४५ | ७२, ३४, ००० | ,, |
| कम्युनिस्ट पक्ष | ५२, ७८, ०९४ | ५९, ७३, ००० | ,, |
| इतर | १९, ३३, २६६ | २२, ३०, ००० | ,, |
| एकंदर बेरीज | ३, ६८, ४५, २७९ | ३, ५४, १०, ००० | ,, |

## सभासद संख्या

| पक्षाचें नांव | जुलै | नव्हेंबर | उणें, अधिक |
|---|---|---|---|
| नाझी | २३० | १९५ | — ३५ |
| सोशालिस्ट | १३३ | १२१ | — १२ |
| कम्युनिस्ट | ८९ | १०० | + ११ |
| सेंट्रिस्ट | ७५ | ७० | — ५ |
| बव्हेरिअन लोक पक्ष | २२ | १८ | — ४ |
| राष्ट्रीय | ३७ | ५० | + ११ |
| जर्मन लोकपक्ष | ७ | ११ | + ४ |
| डेमोक्रॅट्स | ४ | २ | — २ |
| ख्रिश्चन सोशालिस्ट | ४ | ४ | ० |
| इतर | ७ | ४ | — ३ |
| एकंदर | ६०८ | ५७५ | — ३३ |

वरील दोन कोष्टकांवरून असें दिसून येईल कीं जुलैच्या मतनोंदणीपेक्षां नोव्हेंबरमधील एकंदर मतें जरी कमी भरलीं तरी त्यांत राष्ट्रीय व कम्युनिस्ट पक्षांस पूर्वींपेक्षां अधिक मतें मिळून त्या प्रमाणांत राइखस्टागमध्येंही त्यांचे अधिक सभासद निवडून आले. हिटलरपक्षाला पूर्वीपेक्षां ३५ जागा कमी मिळाल्या, आणि फॉन् पापनचा अंदाज तर अगदींच चुकला. फॉन् पापनच्या पक्षाचे सभासद निवडून न आल्यानें त्याला मदत करण्यास कोणताच पक्ष तयार होईना. त्यामुळें त्यानें चॅंसेलरपदाचा राजीनामा देण्याची इच्छा प्रकट केली. ह्या कोंडींतून बाहेर कसें पडावें याची हिंडेन्बुर्गलासुद्धां पंचाईत पडली. डॉ. ह्युगेनबर्ग ( राष्ट्रीयपक्ष ), डॉ. लुडविग काऽस ( सेंट्रिस्ट ), डॉ. डिंगेल्डी ( लोकपक्ष ) वगैरे निरनिराळ्या

पक्षांच्या पुढाऱ्यांशीं विचारविनिमय करून त्यानें हिटलरला बोलावणें पाठविलें. त्यानें ह्या वेळीं नकार न भरतां इतर पक्षाशीं सहकार्य करून आपल्याला प्रधानमंडळ बनवितां येतें कां तें पाहण्याचें कबूल केलें. पण त्याच्याशीं सहकार्य करण्यास कोणताच पक्ष तयार झाला नाहीं. त्यामुळें 'मी नाझी पक्षाचेंच प्रधानमंडळ बनवितो' असें त्यानें हिंडेन्बुर्गला कळविलें. हिंडेन्बुर्गनें त्याच्या ह्या ह्मणण्याला कांहीं अटीवर मान्यता दिली. आजपर्यंत चालत आलेलें आर्थिक व परराष्ट्रीय धोरण हिटलरनें बदलूं नये, राइखस्टागमधील बहुमताप्रमाणें सनदशीर मार्गानें राज्यकारभार पाहावा, व वायमार राज्यघटनेतील ४८ व्या कलमानें अध्यक्षाला दिलेले अधिकार उपयोगांत आणण्याची हिटलरनें शिफारस करूं नये, या त्या अटीपैकीं मुख्य अटी होत्या. या अटी हिटलरला मान्य होण्यासारख्या नसल्यानें 'आपल्याला या अटीवर चॅन्सेलर होता येत नाहीं' असें त्यानें हिंडेन्बुर्गला कळविलें, व त्याच वेळीं नाझी पुढाऱ्यांकरवीं खालील जाहिरनामा काढला. 'हल्लींच्या परिस्थितीमुळें बहुमतास अनुसरून राज्यकारभार पाहणें अशक्य झालें आहे. पितृभूमीची हीन दीन झालेली स्थिति पाहून ती सर्व बाजूंनीं सुधारतां यावी ह्या हेतूनें अध्यक्षापुढें हिटलरनें एक योजना मांडली होती पण अध्यक्ष महाशयास ती योजना पटली नाहीं."

हिटलरनें प्रधानमंडळ बनविण्याचें नाकबूल केल्यामुळें ता २ डिसेंबर १९३२ रोजीं कर्ट फॉन् श्लायकर यास हिंडेन्बुर्गनें चॅन्सेलर नेमलें. फॉन् पापनच्या मानानें श्लायकरच्या हातांत सत्ता अधिक होती. शिवाय श्लायकर हाच मंत्रिमंडळें बनविणारा व मोडणारा आहे, तो लष्करांतील असल्यानें त्याचें हिंडेन्बुर्ग तेव्हांच ऐकतो अशी श्लायकरची आधींच प्रसिद्धी झाली होती. त्यामुळें त्याचें प्रधानमंडळ पुष्कळ दिवस टिकेल अशी लोकांची अपेक्षा होती. पण सुरवातीलाच मी कोणत्याही पक्षाचा नाहीं, देशहिताचा दिसेल तोच मार्ग मी अनुसरीन असें त्यानें जाहीर केलें व लागलीच वाढत असलेल्या बेकारीस आळा घालण्यासाठीं डॉ.

ब्रूनिंगनें प्रशिअन जमीनदारांविषयीं आंखलेली योजनाच त्यानें हिंडेन्बुर्गपुढें ठेवली. त्या योजनेला हिंडेन्बुर्गनें अर्थात्च संमति दिली नाहीं म्हणून श्लायकरनें चॅन्सेलर-पदाचा राजीनामा दिला. आपल्या अधिकाराचा त्याग करण्यापूर्वी त्यानें तीन मार्ग हिंडेन्बुर्गला सुचविलें ते असे. पहिला मार्ग हिटलरला दुसऱ्या पक्षाचें साहाय्य घेऊन चॅन्सेलर होण्यास सांगणें, दुसरा मार्ग अल्पमतवाल्यांना हिटलरला न दुखवितां राज्यकारभार पाहाण्यास सांगणें व तिसरा मार्ग अध्यक्षानें स्वतःचें प्रधान-मंडळ बनवून त्याच्या सल्ल्यानें राज्यकारभाराचें तारूं सुरक्षित नेण्याचा प्रयत्न करणें. हें मार्ग सुचवून त्याबरोबरच कोणत्याही एका पक्षाच्या हातीं अनियंत्रित सत्ता देऊन त्याला राज्यकारभार पाहण्यास सांगूं नये असेंही त्यानें हिंडेन्बुर्गला बजावयास कमी केलें नाहीं.

शेवटीं वरील तीन मार्गांपैकीं पहिला मार्ग हिंडेन्बुर्गनें स्वीकारला व हिट-लरला चॅन्सेलरपद देऊं करून पापनपक्ष व हिटलरपक्ष यांचें संयुक्त प्रधानमंडळ करण्यास त्यानें हिटलरला विनंति केली. ह्या विनंतीला हिटलरनें मान देऊन मी प्रधानमंडळ बनवितो असें आश्वासन दिलें. अशा तऱ्हेनें ता. ३० जानेवारी १९३३ रोजीं हिटलर जर्मनीचा सूत्रचालक झाला.

---

# प्रकरण अकरावें

## हिटलरचो प्रभावळ

१

आज हिटलर जर्मनराष्ट्रनौकेचा कर्णधार झाला आहे. त्याला ह्या पदापर्यंत नेण्याला ज्या व्यक्ति कारण झाल्या व कर्णधाराचें काम ज्यांच्या साहाय्यानें हिटलर पाहणार आहे त्यांच्या विषयीं थोडीशी माहिती हें छोटेसें चरित्र संपविण्यापूर्वी दिली तर अस्थानी होणार नाहीं.

सर्वांत आधीं गॉट्फ्रिड फेडरचा उल्लेख केला पाहिजे. फेडरचें नांव आपणाला ऐकूं येत नाहीं, शिवाय त्याच्याविषयीं फारशी माहितीहि उपलब्ध नाहीं. फेडर नाझी पक्षांत शिरण्यापूर्वी इंजिनिअर होता. आपला धंदा करीत असतांनाच त्यानें अर्थशास्त्राचा अभ्यास केला. पुढें तो अर्थशास्त्रावर व्याख्यानें देऊं लागला. त्याचें एक व्याख्यान हिटलरच्या जर्मन मजूर पक्षापुढें झालें. व्याख्यानांत त्यानें भांडवलशाहीची चिकित्सा केली, ती हिटलरला पटली व त्यानें फेडरला मजूर पक्षाचा सभासद करून घेतलें. फेडर मजूर पक्षाचा सभासद झाल्यामुळें त्या पक्षाला आपलें आर्थिक धोरण आंखतां आलें व आजही नाझी पक्षाचें आर्थिक धोरण फेडरवर अवलंबून आहे. आर्थिक बाबतींत त्याच्यावांचून कोणाचेंच हिटलर ऐकत नाहीं.

हिटलरच्या प्रभावळींतील दुसरें रत्न ह्मणजे ग्रेगर स्ट्रासर होय. स्ट्रासरनें महायुद्धांत कामगिरी बजाविली आहे. तो नाझी पक्षाचा सभासद झाला त्यावेळीं त्याचें औषधी विकण्याचें दुकान अस्तित्वांत होतें. हिटलरला स्ट्रासरची मदत फार पूर्वीपासून मिळत आहे. ता. १ मे १९२३ रोजीं बव्हेरिआवर चढाई करण्याचा हिटलरचा विचार होता. त्यासाठीं दारुगोळा आणण्याची महत्वाची कामगिरी

हिटलरनें स्ट्रासरवर सोंपविली होती. पण म्यूनिकमध्यें दारूगोळा घेऊन शिरण्या-च्यापूर्वीच स्ट्रासर धरला गेला. त्यामुळें हिटलरचा बेत आंतल्याआंतच जिरला. नोव्हेंबरमध्यें हिटलरनें चढाई केली त्यावेळीं स्ट्रासरसुद्धां धरला गेला होता. पण पुराव्याच्या अभावी त्याला सोडून देण्यांत आलें. हिटलर तुरुंगांत गेल्यावर स्ट्रासरनें नाझी पक्ष जिवंत ठेवण्यासाठीं जीवापाड श्रम केलें. त्याकामीं त्यानें आपलें दुकानही विकलें. ह्या कामगिरीबद्दल पारितोषिक ह्मणून हिटलरनें त्याला मतप्रचार कमिटीचा मुख्य नेमलें. हिटलरला पुनः नाझी पक्षाचा सर्वाधिकारी होण्याला स्ट्रासरचीच फार मदत झाली. इ. स. १९३२ मध्यें प्रधानमंडळांत शिरण्याचा स्ट्रासर आग्रह करीत होता तरी हिटलरनें त्याचें ऐकलें नाहीं, ह्मणून त्यानें सध्यां नाझी पक्षांतून आपलें अंग काढून घेतलें आहे.

हिटलरच्या साहाय्यकांत डॉ. रोझेनबर्ग याचीही गणना होते. डॉ. आल्फ्रेड रोझेनबर्ग हा हिटलरच्या फोकिशब्योबाखटरचा मुख्य संपादक आहे. तो स्थापत्य-विशारद असून त्यानें वर्णश्रेष्ठतेचा प्रसार करण्याची कामगिरी आपल्या अंगावर घेतली आहे. राष्ट्रांतील सर्व लोक एकाच वर्णाचे असावे, व अशा एकवर्णी पायावर जर राष्ट्रैक्याची इमारत उभारली तरच ती चिरकाल टिकेल असें रोझेनबर्गचें ह्मणणें आहे. आर्येतर वर्णाचा जर्मनींत छळ होत आहे त्याच्या मूळाशीं रोझेनबर्ग आहे असें ह्मटलें तर चालण्यासारखें आहे. सध्यां रोझेनबर्गकडे परराष्ट्रीय धोर-णाच्या बाबतींत हिटलरला सल्ला देण्याची कामगिरी आहे.

उल्लेख करण्यासारखी नाझी पक्षांतील चवथी व्यक्ति ह्मणजे डॉ. विल्हेल्म फ्रिक् ही होय. डॉ. फ्रिक्चा उदरनिर्वाह वकिलीवर होतो. इ. स १९२३ मध्यें हिटलरबरोबर फ्रिकला शिक्षा झाली होती. पण त्याची पुनः चौकशी करण्यांत येऊन त्याला सोडून देण्यांत आले. इ. स १९२९ मध्यें तो थुरिंगिया संस्थानचा गृहमंत्री झाला. गृहमंत्री असतांना नाझी धोरण अमलांत आणण्याचा त्यानें कसून

प्रयत्न केला; त्यामुळें त्याच्या विरुद्ध निंदाव्यंजक ठराव होऊन त्याला आपलें पद सोडावें लागलें. खुनी नाझींना पासपोर्ट मिळवून देऊन पळवून लावण्यांत ह्याचें अंग असें असें ह्मणतात. नाझी पक्षांतील अत्यंत चळवळया व्यक्तींत याची गणना होते. सन १९२४ पासून सालोसाल तो राइखस्टागमध्यें निवडून येत आहे, व राइखस्टागमधील नाझी सभासदांचें पुढारीपण डॉ. फ्रिक् याजकडेच आहे. सध्यांच्या नाझी राजवटींत त्याच्याकडे गृहमंत्री पद आहे.

कॅप्टन् हरमान गोअरिंग ही हिटलरच्या साह्यकांपैकीं मुख्य व्यक्ति आहे. याचा जन्म उत्तर बव्हेरिआंत झाला. हा खानदानीच्या कुळांतील असल्यामुळें अहंमन्य आहे. यानें महायुद्धांत फार श्रेष्ठप्रतीची कामगिरी बजावली आहे. याच्या वैमानिक काफिल्याचें नांव ऐकतांत शत्रुसैन्य घाबरे. विमानांतून युद्ध कर-ण्यांत याच्या इतका वाकबगार कोणी नव्हता. इ. स. १९२३ च्या चढाईंत यानें-ही हिटलरला मदत केली आहे. पण धरपकडीला सुरवात झाल्याबरोबरच तो जमर्नीतून पळून गेला. त्यानें डेन्मार्क व स्वीडनमध्यें विमान खात्यांत नोकरी केली व नंतर इटलींत जाऊन इटलिअन फासिझमचा अभ्यास केला. परत आल्यावर नाझी तुफान फौजेचें नेतृत्व त्याला देण्यांत आलें. तो शिस्तीचा फार भोक्ता आहे. नाझी तुफान फौज गोअरिंगच्यामुळेंच कार्यक्षम झाली आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. आड येईल तें कापून काढावें येवढेंच त्याला ठाऊक आहे. सध्यांच्या नाझी राजवटींत त्याच्याकडे पुष्कळच कामें सोंपविण्यांत आली आहेत, राइ-खस्टागचा सभापति तोच असून प्रधानमंडळांत सल्लागार मंत्र्याचें व विमान-मंत्र्याचें काम तोच करतो, शिवाय प्रशिआंतील मुख्यमंत्र्याचें व मुख्य पोलीस-अधिकाऱ्याचें कामही त्याच्याकडेच सोंपविण्यांत आलें आहे. पोलीस व विमान मंत्री तोच असल्यानें दोन पोलीसविमानें बांधण्याचा त्यानें निश्चय केला आहे. त्याचा हा निश्चय व्हेर्सायच्या तहाविरुद्ध असला तरी त्याची त्याला दिक्कत नाहीं. विरोधीपक्षांची पाळेंमुळें खणून काढण्याचें काम गोअरिंगवर सोंपविण्यांत आलें

आहे. हें काम तो किती तत्परतेनें करीत आहे तें जर्मनींतील अलीकडील घडा-मोडीवर लक्ष असणारांच्या तेव्हांच ध्यानांत येईल.

हिटलरच्या प्रभावळींतील आणखी एक महत्वाचें रत्न ह्मणजे डॉ० पॉल जोसेफ गोबेल्स हें होय हिटलर तुरुगांत असतां नाझी पक्ष जिवंत ठेवणाच्या कामीं स्ट्रासरप्रमाणें गोबेल्सनेंही परिश्रम घेतले. बर्लिन भागांत नाझींची चळवळ नव्हती तेथें गोबेल्सला पाठविण्यांत आले व त्या राजधानीच्या गांवीं नाझी पक्ष स्थापून तो गोबेल्सनें दृढमूल केला. याच्याच सल्ल्यावरून पापन–श्लायकर प्रधानमंडळांत हिटलरनें भाग घेण्याचें नाकारलें. वक्तृत्वाच्या बाबतींत हिटलर-नंतर याचाच नंबर लागेल. अलीकडे त्यानें बर्लिन येथें ॲग्रिफ नांवाचें स्वतःचें वर्तमानपत्र चालविलें आहे. हिटलरच्या प्रधानमंडळांत ह्याचा शिरकाव झाला असून त्याच्यासाठीं प्रचार व बातमीखातें मुद्दाम काढून त्या खात्यावर त्याला मुख्य नेमलें आहे. त्याची नेमणूक झाल्यावर त्यानें सर्व बातमीदारांना एकत्र बोलावलें. व ' कोणती बातमी प्रसिद्ध करावयाची व कोणती प्रसिद्ध करावयाची नाहीं तें मी तुह्माला सांगेन व मी देईन तो मजकूर तुह्मीं प्रसिद्ध केला पाहिजे ' असें त्यानें बातमीदारांना बजावलें आहे.

# प्रकरण बारावें

## चॅन्सेलर हिटलर

राष्ट्राध्यक्ष हिंडेन्बुर्ग हिटलरला चॅन्सेलर करण्यास अनुकूल नव्हता, तरी शेवटीं हिटलरच्या अंगावर चॅन्सेलरचीं वस्त्रें चढविणें त्याला भाग पडलें. आतां पर्यंत प्रधानमंडळांत शिरकाव करून घेण्याची संधि हिटलरला दोनदां प्राप्त झाली होती, पण ' प्रधानमंडळांत चॅन्सेलर म्हणूनच मी बसेन ' असें हिटलरनें प्रत्येक वेळीं सांगून आलेली संधि धुडकावून लावली. पण अखेरीस त्याचा विजय होऊन त्याला चॅन्सेलर नेमण्यांत आलें. चॅन्सेलर झाल्यावर हिटलरनें खालीलप्रमाणें आपलें प्रधान-मंडळ बनविलें.

| | |
|---|---|
| अडोल्फ हिटलर | चॅन्सेलर |
| फ्रान्झ फॉन् पापन | दुय्यम चॅन्सेलर |
| बॅरन कॉन्स्टंटाईन फॉन् न्यूराथ | परराष्ट्रीय मंत्री |
| डॉ. विल्हेल्म फ्रिक् | गृहमंत्री |
| सेनापति वेर्नर फॉन् ब्लॉमबर्ग | युद्धमंत्री |
| कौंट लुट्झ श्वेरीन फॉन् क्रोसिग | फडणीस |
| डॉ. आल्फ्रेड ह्युगेन्बर्ग | व्यापार व शेतकी खात्याचा मुख्य |
| फ्रान्झ सेल्ट | मजूर व कामगार खात्याचा मुख्य |
| बॅरन पॉल फॉन् एल्ट्झ रुबेनाख | दळणवळण व पोस्ट खात्याचा मुख्य |
| ग्वेन्थर गेरेक् | बेकारीवर इलाज करण्यासाठीं |
| कॅप्टन हरमान गोअरिंग | राइखस्टागचा सभापति, विमान व सल्लागारमंत्री, प्रशिआचा मुख्य प्रधान व मुख्य पोलिस अधिकारी |
| डॉ. गोबेल्स | मतप्रचार व बातमीखात्याचा मुख्य |

वरील सर्व मंडळी कट्टर साम्राज्यवादी आहेत. त्यांपैकीं न्यूराथ, कोसिग, रूबेनाख व गेरेक हे चौघे श्लायकरच्या प्रधानमंडळांत होतेच. ब्लोंमबर्ग राज-कारणांत भाग न घेणारांपैकीं असून त्यानें महायुद्धांत मर्दुमकी गाजविली आहे. तो लष्करी खात्याचा तज्ज्ञ आहे. अमेरिकन सैन्याची पुनर्रचना करण्यासाठीं त्याला बोलवण्यांत आलें होतें, तिकडून परत आल्यापासून जिनेव्हा येथें भरणाऱ्या परि-षदांत जर्मन प्रतिनिधींचा सल्लागार म्हणून त्याची नेमणूक झाली होती. ह्युगेबर्ग व सेल्ट हे राष्ट्रीय पक्षाचे नेते आहेत ( पैकीं ह्युगेनबर्गनें सध्यां राजीनामा दिला असल्याचें कळतें ). हिटलर, गोअरिंग, फ्रिक् व गोबेल्स हे नाझी पक्षाचे पुढारी आहेत, व पापन पूर्वी सेंट्रिस्ट पक्षाचा सभासद होता.

श्लायकरची सूत्रें हातांत घेतल्याबरोबर हिटलरनें राइखस्टाग बरखास्त केली व ता. ५ मार्च रोजीं पुनः सार्वत्रिक निवडणुकी होतील असें जाहीर केलें. ता. १ फेब्रुआरी रोजीं रेडिओ पुढें भाषण करून त्यानें आपल्या प्रधानमंडळाचा कार्यक्रम आखला. ' गेल्या चौदा वर्षांत माजलली अंदाधुंदी नाहीशी करण्यांत येईल, बेकारी नष्ट करण्यासाठीं उपाय योजण्यांत येतील, नाणें बाजाराची सद्यः-स्थिति खालावेल असें धोरण आम्ही स्वीकारणार नाहीं, राज्यव्यवस्थेंत जेथें जेथें काटकसर करणें शक्य आहे तेथें तेथें करण्यांत येईल' असें त्यानें जाहीर केलें. मार्क्सवादामुळें जर्मननीतीच्या व धर्माचा पाया पोखरला गेला आहे' असें सांगून ' आंतरराष्ट्रीय राजकारणांत शांतता प्रस्थापन करण्याचा आम्ही कसून प्रयत्न करूं ' असें त्यानें वचन दिलें. ' आमची येवढीच इच्छा आहे कीं इतर राष्ट्रांनीं नुसतें तोंडानें जर्मनी आमच्या बरोबरीचें राष्ट्र आहे असें न म्हणतां त्यांनीं आमचे हिरावून घेतलेले हक्क आम्हाला परत द्यावेत व राष्ट्रमालिकेंत समान दर्जाचें, समान हक्कांचें व समान मोलाचें नवें जर्मन राष्ट्र नेऊन बसविण्यास आम्हांस मदत करावी ' अशी इच्छा प्रकट करून त्यानें आपलें भाषण संपविलें.

हिटलर अधिकारारूढ झाल्याबरोबर कम्युनिस्ट लोकांवर नाझींनीं आपली मोहीम सुरू केली. हिटलरनें फर्मान काढून कम्युनिस्टांना उघड्या जागेवर

सभा भरविण्यास व मिरवणुकी काढण्यास मनाई केली. सभागृहांत होणाऱ्या सभासुद्धां पोलीसांच्या सक्त नजरेखालीं होऊं लागल्या. वारंटांवांचून कम्युनिस्ट पुढाऱ्यांना पकडण्यांत येऊं लागले व त्यांच्या राहत्या घरांची झडती घेण्यांत आली. नाझी व कम्युनिस्टांत मारामाऱ्या होऊं लागल्या त्यामुळें शार्लटेन्बर्गमध्यें लष्करी कायदा पुकारण्यापर्यंत मजल गेली. कम्युनिस्टांचीं वर्तमानपत्रेंही बंद पाडण्यांत आलीं. या अत्याचारांना प्रत्युत्तर ह्मणून कम्युनिस्टांनीं सार्वत्रिक संप पुकारण्याची तयारी चालविली, पण त्यांचा हा बेतही हाणून पाडण्यांत आला. हिटलर चॅन्सेलर झाल्याबरोबर जर्मनींत सुलतानशाही सुरूं झाल्याचा सर्वांना भास होऊं लागला.

राइखस्टाच्या बरोबर प्रशिअन डाएट बरखास्त करण्याचें हिटलरनें ठरविलें. पण ही गोष्ट डाएटचा अध्यक्ष, प्रशिअन कौन्सिल ऑफ स्टेटचा अध्यक्ष व प्रशिअन मुख्यप्रधान या तिघांच्या समितीच्या स्वाधीन असल्यानें हिटलरचा बेत सिद्धीस जाण्याचा रंग दिसेना. डाएटचा अध्यक्ष नाझीच होता ह्मणून त्यानें पापनला प्रशिआचा सर्वाधिकारी केलें व त्याला मुख्य प्रधानाच्या ऐवजीं कमिटींत बसावयास सांगून त्यानें डाएट बरखास्त करण्याचा ठराव पास करून घेतला.

ता. ६ फेब्रुआरी रोजीं हिंडेन्बुर्गनें आणखी एक वटहुकूम काढला. त्या अन्वयें वर्तमानपत्रांनीं सरकारविरुद्ध लोकांस चिथविलें अगर हरताल पाडण्यास उत्तेजन दिलें तर त्यांना पहिल्या अपराधाच्या वेळीं ४ आठवडे व पुढील अपराधाला ६ महिने कैदेची शिक्षा करण्यांत येणार होती. हा वटहुकूम परदेशीय वर्तमानपत्रांनासुद्धां लागू होता, व त्याचा वारंवार उपयोग केल्यामुळें जर्मनींत निवडणुकीपूर्वी नाझी वर्तमान पत्राशिवाय दुसरें वर्तमानपत्र दिसत नसे.

इतका कडक अंमल असतांही ता. २८ फेब्रुआरी रोजीं राइखस्टागच्या सभागृहास आग लावण्यांत आली. ही आग कम्युनिस्टांनीं लावली व आगलाव्या

व्हॅन डर ल्यूब नांवांचा डच कम्युनिस्ट आम्ही पकडला आहे व त्यानें आपला गुन्हा कबूल केला आहे असें प्रसिद्ध करण्यांत आलें. ही आग निवडणुकींत यश मिळण्यासाठीं गोअरिंगनें मुद्दाम लावली असें कम्युनिस्ट ह्मणतात. तें कांहीं असलें तरी या आगीमुळें जर्मन सरकारचें ४५ लक्ष रुपयांचें नुकसान झालें येवढें खरें. शिवाय आगीचें निमित्त पुढें करून हिंडेन्बुर्गनें आणखी एक वट हुकूम काढला व वायमार राज्यघटनेनें जर्मन नागरिकास दिलेले विचार व व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क व पत्रव्यवहाराच्या गुप्ततणाविषयींचा हक्क तात्पुरते रद्द केले. कायदा, सुव्यवस्था व शांतता राखण्यासाठीं एखादें संस्थान आवश्यक उपाय योजीत नाहीं असें मध्यवर्ती सरकारास दिसल्यास त्यानें अशा संस्थानाचा राज्यकारभार आपल्या हातीं घ्यावा असेंही या वटहुकूमानें ठरविण्यांत आलें. या सर्वांचा परिणाम ता. ५ मार्चच्या निवडणुकींत नाझी पक्षाला प्रचंड बहुमत मिळण्यांत झाला. त्या दिवशींच्या निवडणुकीचा परिणाम खालीं दर्शविल्याप्रमाणें लागला:—

| पक्ष | मतें | जागा | उणें, अधिक |
|---|---|---|---|
| नाझी | १,७३,००,००० | २८८ | + ९३ |
| राष्ट्रीय | ३१,००,००० | ५३ | + २ |
| सोशल डेमोक्रॅट्स | ७०,००,००० | ११८ | — ३ |
| कम्युनिस्ट | ४८,००,००० | ८१ | — १९ |
| सेंट्रिस्ट व बव्हेरिअन लोकपक्ष. | ५५,००,००० | ९१ | + ३ |
| इतर | १३,४७,००० | १७ | — ४ |
| एकंदर | ३,९०,४७,००० | ६४८ | +७२ |

प्राशिअन डाएटच्या निवडणुकींत सुद्धां नाझींचा अपूर्व विजय झाला. या निवडणुकीमुळें आणखी एक गोष्ट प्रत्ययास आली ती म्हणजे राष्ट्रीय पक्षानें नाझींशीं जरी सहकार्य केलें नाहीं तरी आतां चालेल अशी परिस्थिति निर्माण झाली आहे. कारण कम्युनिस्ट व सोशालिस्ट पुढारी तुरुंगांत खितपत पडलें आहेत, अगर सुरक्षिततेसाठीं परदेशास निघून गेले आहेत. त्यामुळें एकट्या नाझी पक्षालाच हुकमी बहुमत मिळालें आहे. या हुकमी बहुमताच्या जोरावर हिटलर आपला अंमल कसा गाजवीत आहे, त्यानें जर्मनींत काय काय सुधारणा केल्या, परराष्ट्रीय राजकारणांत कोणत्या तऱ्हेनें वागला वगैरे गोष्टी पुढील प्रकरणांत पाहूं.

---

# प्रकरण तेरावें

## हिटलरशाहीचें प्रथम दर्शन

आतांपर्यंत बव्हेरिआकडे हिटलरची दृष्टि वळली नव्हती. पण निवडणुकीमुळें अनियंत्रित सत्ता आपल्या हातांत येणार असें दिसल्याबरोबर त्यानें बव्हेरिआचा मुख्य प्रधान हाइन्रिख हेल्ड याला बडतर्फ केलें व त्याच्या जागीं जनरल फ्रान्झ रिटर फॉन एप्प यास बव्हेरिआचा गव्हर्नर नेमलें. अशा तऱ्हेनें लोकशाहीचे कट्टे पक्षपाती प्रुशिआ व बव्हेरिआ यांची वाट लावल्यावर इतर छोट्या संस्थानांत मध्यवर्ती सरकारचा अंमल सुरू करणें सुलभ होतें. जर्मन राइख ( साम्राज्य ) मध्यें एकंदर १७ संस्थानें आहेत, त्यांपैकीं प्रुशिआ व बव्हेरिआ हीं मोठीं संस्थानें आहेत व आपल्या हक्कासाठीं झगडण्याची त्यांची तयारी आहे. पण अशा संस्थानांना सुद्धां हिटलरनें आपल्या ताब्यांत घेतल्यावर राहिलेल्या १५ संस्थानांचा ताबा घेण्यास हिटलरला कितीसा वेळ लागणार ? वूरटेमबर्ग, सॅक्झनी, बाडन, हेस्स, शामबुर्ग-लिप्पे, व ब्रेमन या संस्थानांतही वरील प्रमाणेंच राइख कमिशनर नेमण्यांत आले व राहिलेल्या नऊ संस्थानांतील कायदेमंडळांत नाझीपक्ष प्रबळ असल्यानें तीं तशीच ठेवण्यांत आलीं. इतकेंच करून हिटलर थांबला नाहीं. त्यानें लोक-शाहीच्या निशाणास मूठमाती देऊन त्या जागीं कायसरचें निशाण लावावें व जुन्या व नव्याच्या एकीचें प्रतीक ह्मणून त्या निशाणाबरोबरच नाझीचें स्वस्तिकां-कित निशाण डुलत ठेवावें असें फर्माविलें.

नव्या राइखस्टागची पहिली बैठक पॉट्सडाम राजप्रासादांतील गॅरिझन चर्च मध्यें भरली. त्यावेळीं हिंडेन्बुर्ग व हिटलर यांचीं भाषणें होऊन सर्व सभासदांना ‘ आपल्या संस्कृतीची व इतिहासाची आठवण ठेवा ’ असें सांगण्यांत

आलें. ता. २३ मार्च रोजीं राइखस्टागची सर्वसाधारण सभा क्रोल्स ऑपेरा हौस-मध्यें भरून एक पांचकलमी कायदा पास करण्यांत आला व राइखस्टागचे सर्व अधिकार नाझी सरकारास देण्यांत आले. हा कायदा ४४१ विरुद्ध ९४ मतांनीं पास झाला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या कायद्याचीं पांच कलमें येणेंप्रमाणें आहेतः—

(१) प्रधानमंडळाला 'फेडरल' कायदे करतां येतील; व राइखस्टागच्या संमतीवांचून जमाखर्चाचें अंदाजपत्रक तयार करतां येईल. कर्ज उभारण्याचा अधिकार ही या कलमानें सरकारास दिला आहे.

(२) प्रधानमंडळाला वायमार राज्यघटनेला बाधक असे कायदे करतां येतील. पण या कलमाखालीं राष्ट्राध्यक्ष्याच्या अधिकारांचें अतिक्रमण होईल असे कायदे करतां येणार नाहींत.

(३) असे कायदे चॅन्सेलरनें तयार करावेत व सरकारी गॅझेटमध्यें प्रसिद्ध करावेत.

(४) कायद्यांत जर कांहीं लिहिलें नसेल तर अशा कायद्यांचा अंमल ते प्रसिद्ध केल्याच्या दुसऱ्या दिवशीं सुरू होईल.

(५) हा कायदा ज्या दिवशीं प्रसिद्ध करण्यांत येईल त्या दिवसापासून अमलांत यावयाचा आहे. ह्याचा अंमल ता. १ एप्रिल १९३७ पर्यंत राहील. जर येवढ्या मुदतींत हल्लींचें सरकार बदललें तर हा कायदा रद्द समजावा.

अशा तऱ्हेनें सत्ता हातीं आल्यावर नाझींना मद चढल्यासारखें झालें. त्यांनीं ज्यूंचा अनन्वित छळ केला. या छळांत फर्मानें काढून सरकारनेंही भर घातली. ज्यूंना शिक्षकांच्या व प्रोफेसरांच्या जागावरून बडतर्फ करण्यांत आलें; ज्यू

डॉक्टरांना व वकिलांना आपला धंदा करण्यास बंदी करण्यांत आली. ज्यू व्यापाऱ्यांच्या दुकानांवर बहिष्कार पुकारण्यांत आला, व कांहीं ठिकाणीं त्यांची मालमत्ताही जाळण्यांत आली. ज्यूंच्या छळाच्या हकीगती बाहेर फुटल्यामुळें जर्मनीबाहेरील ज्यूंनीं जर्मन मालावर बहिष्कार पुकारला व त्यांना ह्या कामीं अमेरिकन व इंग्लिश जनतेचें साहाय्य मिळाल्यामुळें जर्मन राष्ट्राला हा बहिष्कार जाणवूं लागला व त्यामुळें ज्यूंच्या छळाची तीव्रता कमी झाली.

ज्यूंचा छळ होणें थोडेफार थांबतें न थांबतें तोंच कम्युनिस्ट व सोशालिस्टांच्या छळास सुरवात झाली. त्यांत नाझी सरकारनें अथपासून इतिपर्यंत भाग घेतल्यानें त्याची परिणती हे दोन्ही पक्ष नामशेष होण्यांत झाली, व ह्या पक्षांचा सर्व निधि सरकारनें आपल्या ताब्यांत घेतली. कम्युनिस्ट व सोशालिस्टांसारख्या बलिष्ठ पक्षांस नामशेष केल्यावर सरकारनें आपली दृष्टि राहिलेल्या पक्षांकडे वळविली व त्यांनाही नामशेष करण्यांत आलें. ह्या सपाट्यांतून ' बॉय स्काउट ' सारख्या संस्थाही सुटल्या नाहींत ! अशा तऱ्हेनें सध्यां उघडपणें जर्मनींत एकाच पक्षाचें म्हणजे नाझी पक्षाचें अस्तित्व आहे.

अंतर्गत कारभारांत दडपशाहीचें धोरण स्वीकारल्यानें परराष्ट्रीय राजकारणांत सुद्धां हिटलर आजपर्यंत बोलत होता तसाच वागणार कीं काय अशी सर्व राष्ट्रांना भीति पडली. आपलें परराष्ट्रीय धोरण जाहीर करण्यासाठीं ता. १७ मे रोजीं राइखस्टागची खास बैठक हिटलरनें बोलाविली होती. या बैठकींत जहाल धोरण स्वीकारल्याचें हिटलरनें जाहीर करूं नये म्हणून अमेरिकेचे अध्यक्ष रूझव्हेल्ट यांनीं ' धोक्याची सूचना ' म्हणून एक पत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत जर्मनीनें जहालधोरण स्वीकारल्यास पुढें धोका आहे असें सूचित केलें होते. या पत्रकामुळें शस्त्रसंन्यास परिषद आतां खास तरणार असें सर्व राष्ट्रांना वाटलें. रूझव्हेल्टपत्रक प्रसिद्ध झाल्याच्या दुसऱ्याच दिवशीं हिटलरनें आपलें धोरण जाहीर केलें. हिटलरच्या भाषणांतील मवाळपणा पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. त्याच्या भाषणांतील खालील मुद्दे लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

(१) व्हेसायचा तह बदलण्याची आवश्यकता आहे. (२) युद्धखंडणी भरणें म्हणजे जर्मनीनें आपलें मरण ओढवून घेणें आहे तरीही आजपर्यंत जर्मनीनें ती भरली आहे. ( ३ ) जर्मनींत झालेल्या राष्ट्रीय जागृतीमुळें बाहेरच्या जगानें घाबरून जाण्याचें कारण नाहीं. ( ४ ) जर्मनीनें शस्त्रसंन्यास केला तर इतर राष्ट्रांनींही शस्त्रसंन्यास केला पाहिजे. जी गोष्ट इतर राष्ट्रांनीं केली तर जर्मनी हरकत घेईल अशी गोष्ट स्वतः जर्मनीही करणार नाहीं. ( ५ ) इतर राष्ट्रें जर पूर्णपणें शस्त्रसंन्यास करावयास तयार असलीं तर जर्मनीही सर्व शस्त्रास्त्रें टाकण्यास तयार आहे. ( ६ ) इतर राष्ट्रांनीं जर्मनीला दिलेली वचनें पूर्ण करून घेण्याचा जर्मनीला नैतिक हक्क आहे. जर्मनीने तहांतील अटी पाळल्या नाहींत असें म्हणणें चुकीचें आहे. ( ७ ) तुफान फौज हें खाजगी सैन्य आहे. सरकार ह्या सैन्याला कसलीही मदत करीत नाहीं. हें सैन्य लष्कराच्या बरोबरीचें आहे असें झालें, तर आखाडे, तालीमखाने वगैरे संस्थांच्या सभासदांना सुद्धां सैनिक असें संबोधावें लागेल. (८) युरोपांत युद्ध उपस्थित केलें तर केवळ मूर्खपणा होईल. त्यापासून कोणाचाच फायदा होणार नाहीं. ( ९ ) सर्व राष्ट्रांतील शस्त्रास्त्रें गुणतः एका दर्जाचीं ठेवून सध्यां असलेलीं बचावाचीं साधनेंही नष्ट करण्यास जर्मनीची हरकत नाहीं. (१०) पांच वर्षें हा काळ तयारीचा काळ समजून जर्मनी आहे त्या स्थितींत राहण्यास तयार आहे. पण ह्या मुदतीनंतर इतर राष्ट्रांनीं आपलीं शस्त्रास्त्रें जर्मनीच्या इतकीं कमी करण्यास तयार झालें पाहिजे. ( ११ ) इतर राष्ट्रांनीं आपल्या चढाईच्या शस्त्रास्त्रांचा त्याग केल्यास जर्मनीही चढाईचीं शस्त्रास्त्रें ठेवण्याचा आग्रह धरणार नाहीं. ( १२ ) राष्ट्रांच्या सैन्याची मोजदाद करतांना फ्रेंच सैन्यांत फ्रेंच वसाहतींतील सैन्यसुद्धां धरण्यांत यावें. ( १३ ) जर्मन राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्रावर आक्रमण करण्याची इच्छा नाहीं. ( १४ ) मॅकडोनाल्ड-योजनेनें शस्त्रसंन्यासाचें कोडें सुटण्यास मदत होईल असें जर्मनीस वाटतें. वगैरे.

हिटलरचें भाषण संपल्यानंतर ' परराष्ट्रीय धोरणाच्या बाबतींत सर्व जर्मन राष्ट्र जर्मन सरकारच्या मागें आहे ' असा ठराव राइखस्टागनें मतैक्यानें पास

केला. हिटलर भाषण संपवून बाहेर पडला त्यावेळीं सर्व सभासदांनीं त्याला उत्थापन दिलें व आजपर्यंत न झालेली अशी ही गोष्ट पाहून " खरोखर आतां जर्मनींत ऐक्य नांदूं लागलें आहे " असें हिटलरनें उद्गार काढले. हिटलरनें पुढें शांततेच्या मार्गावरील पहिलें पाऊल म्हणून इंग्लंड-फ्रान्स-जर्मनी व इटली या राष्ट्रांत झालेल्या चौरंगी तहास आपली संमती दिली.

परराष्ट्रीय धोरण जाहीर केल्यानंतर हिटलर अंतर्गत सुधारणा करण्याच्या मागें लागला व ता. १ जून १९३३ रोजीं आपल्या आर्थिक संकट निवारणार्थ योजलेल्या कार्यक्रमाचा थोडासा भाग त्यानें जर्मन जनतेपुढें ठेवला. त्या कार्य-क्रमाप्रमाणें सार्वजनिक हिताचीं कामें सरकार लवकर आपल्या हातीं घेईल; बेकारांना काम पुरविण्यासाठीं रस्ते, पूल वगैरे नवे बांधण्यांत येतील. या ठिकाणीं काम करणारांना एक चांगलें जेवण व बेकारीभत्ता मिळेल. शेतकीची व उद्योग-धंद्याची स्थिति पूर्वी इतकी भरभराटीस येईपर्यंत सरकार शेतकऱ्यांना व कार-खानदारांना मदत करील. सावकारांनीं शेतकऱ्यांना कर्जाऊ दिलेल्या रकमेवरील व्याजाचा दर ४॥ पासून ५॥ टक्केपर्यंत कमी करण्यांत येईल व त्यामुळें होणारें सावकारांचें नुकसान सरकार भरून देईल.

शिवाय सरकार विवाह करण्यास उत्तेजन देणार आहे व त्यासाठीं अविवाहितां-वर कर बसविण्यांत येणार आहे. ज्या अविवाहित स्त्री पुरुषांची विवाह करण्याची इच्छा पैशाच्या अभावीं सफल होऊं शकत नाहीं अशांना सरकार कर्ज देणार आहे. हें कर्ज पुढें हप्त्या हप्त्यानें सरकार फेडून घेईल. स्त्रियांनीं त्यांच्या घराच्या बाहेर काम करूं नये असा कायदा होणार आहे; पण ज्या स्त्रियांच्या नवऱ्यांचें मासिक उत्पन्न १२५ मार्कांपेक्षां कमी असेल त्यांना घराबाहेर काम करण्यास परवानगी देण्यांत येणार आहे.

जर्मन राष्ट्रांतील प्रत्येक नागरिक सुदृढ सशक्त व निरोगी असावा म्हणून एक नवा कायदा तयार करण्यांत आला असून त्याचा अंमल ता. १ जानेवारी

१९३४ पासून होणार आहे. त्या अन्वयें ज्यांच्यांत अनुवंशिक अंधत्व, बधिरत्व अगर मूकत्व असेल, अथवा ज्यांना कांहीं विशिष्ट रोग झालें असतील त्यांनीं स्वतःला वांझ करून घेऊन मग विवाह करावा असें ठरविण्यांत आलें आहे.

सध्यां सुरूं असलेल्या हिटलरशाहीचें चित्र थोडक्यांत वर वर्णन केल्याप्रमाणें आहे. यांत ज्यूंच्या व नाझीतर पक्षीयांच्या छळावांचून वाईट असें कांहींच नाहीं. इतर पक्षांच्या कार्यक्रमाकडे पाहिलें तर त्यांनाही अशा तऱ्हेच्या सुधारणा अमलांत आणावयाच्या होत्या पण त्यांच्यांत नाझीपक्षाइतका जोर नसल्यानें त्यांना तसें करणें शक्य झालें नाहीं. पण हिटलरनें तेंच आपल्या हुकूमशाहीनें अंमलांत आणलें.



# प्रकरण चवदावें

## उपसंहार

हिटलरचें प्रस्तुत चरित्र येथें संपलें. तें वाचून चवदा वर्षांच्या अल्प काळांत एक सामान्य अज्ञात माणूस जर्मनीचा अनभिषिक्त राजा कसा झाला ? अल्पावधींत त्याला जें अपार यश प्राप्त झालें, तें मिळविण्यासाठीं त्याला किती अविश्रांत मेहनत करावी लागली ? तो आपल्या अंगच्या गुणांमुळें एवढ्या मोठ्या पदवीस चढला, कीं केवळ परिस्थितीनें त्याच्या गळ्यांत सर्वाधिकाऱ्याची माळ पातली ? ही माळ त्याच्या गळ्यांत किती दिवस टिकून राहील ? मुसोलिनी व स्टॅलीन हे अनुक्रमें इटलीचे व रशियाचे सर्वाधिकारी आहेत. त्यांच्यांत व हिटलरमध्यें साम्य आहे काय ? असल्यास किती आहे ? राष्ट्राचा सर्वाधिकारी होण्यास अंगीं कोणते गुण असावयास हवेत ? लोकशाहीस मुरड घालून सर्वाधिकारी नेमणें कितपत श्रेयस्कर आहे ? असे प्रश्न आपल्या पुढें उभे राहतात. या प्रश्नांना आजच्या अनिश्चित परिस्थितींत निश्चित उत्तरें मिळणें कितपत शक्य आहे तें आतां आपण पाहूं.

हिटलर इतक्या अल्पावधींत यशस्वी होण्यास जर्मनींतील युद्धोत्तर परिस्थिति व हिटलरच्या अनुयायांची त्याच्यावरील अचल श्रद्धा हीं दोन मुख्य कारणें आहेत. व्हर्सायि येथें तहावर सह्या होऊन महायुद्धाची परिसमाप्ति झाली. विजयी राष्ट्रें आपण जिंकलों व आपल्या आर्थिक हानींची पूर्ण भरपाई होणार असें वाटून आनंदांत निमग्न झालीं होतीं, तर जर्मन राष्ट्र प्रेसिडेन्ट विल्सनच्या चवदा तत्वांना भुलून आपण विनाकारण तह केला असें ह्मणूं लागलें होतें.

व्हेर्सायच्या तहानें विलसनच्या तत्वांना हरताळ फांसली, व जर्मनीच्या मानेवर युद्धकर्जफेडीचें जड जोखड ठेवलें. शिवाय परराष्ट्रीय व अन्तर्गत व्यवहाराच्या बाबतींतसुद्धां जर्मनीला इतकें जखडून टाकण्यांत आलें होतें कीं आपल्या मानेवरील कर्जाचें जोखड घेऊन आपल्याला चार पांवलें तरी टाकतां येतील कीं नाहीं अशी जर्मनीला शंका येऊं लागली. तरीही जर्मनीनें आपला मार्ग आक्रमण्यास सुरवात केली. सन १९२२ पर्यंत कसेंतरी निभावलें. परिस्थितीच्या कांचामुळें कर्जफेडीचे हप्ते जबर आहेत अशी त्या सालीं जर्मनीनें तक्रार केली, व एक हप्ता त्याला भरतां न आल्यानें व्हेर्सायच्या तहाची ढाल हातीं घेऊन फ्रान्सनें जर्मनींतील औद्योगिक महत्वाचें प्रान्त आपल्या ताब्यांत घेतलें. फ्रान्सच्या या दंडुकेशाहीमुळें दोस्तराष्ट्रांवर व जर्मनसरकारवर जर्मन जनता अत्यंत चिडली व तिनें प्रतिकार करण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. प्रतिकाराचा फायदा येवढाच झाला कीं जर्मनीला कर्जफेडीच्या हप्त्यांत थोड्या सवलती मिळाल्या. या सवलतीमुळें जर्मनीच्या मानेवरील कर्जाचें ओझें कमी झालें नाहीं; उलट त्यांत जागतिक आर्थिक दुःस्थितीमुळें अधिकच भर पडली, व १९३२ मध्यें या ओझ्याखालीं जर्मनी पार दबला. या परिस्थितीचा हिटलरनें पूर्ण उपयोग करून घेतला. "वेळोवेळीं ओढून धरण्याचें सोडून जर्मन मुत्सद्दी दोस्तराष्ट्रें ह्मणतील त्याला मान डोलवीत आहेत, आपल्या देशांतील परिस्थितीचा बिलकूल विचार करीत नाहींत, आह्मी या सर्व राष्ट्रांना धुडकावून लावूं, त्यांच्या हातीं एक कपर्दिकसुद्धां लागूं देणार नाहीं" असें प्रतिपादण्याचा हिटलरनें सपाटा लावला. त्यामुळें चवदा वर्षें सोशालिस्ट व सेंट्रिस्ट पक्षांनीं राज्यधुरा वाहिली पण त्यांना जर्मनीला चांगले दिवस दाखवितां आले नाहींत असें वाटून जर्मन जनतेनें सध्यां हिटलरच्या हातांत सत्ता दिली आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

हिटलर यशस्वी होण्याला आणखीही एक कारण आहे. हिटलरच्या तरुण अनुयायांची त्याच्यावर अचल श्रद्धा आहे. त्यामुळें हिटलरचीं बरीं वाईट मतें जनतेंत पसरविण्याची कामगिरी ते अहमहमिकेनें करतात. त्यांना नाझी पक्षाची

मतें ह्मणजे एका नवीन धर्मपंथाचें तत्वज्ञान आहे असें वाटतें, व ह्या हिटलर-धर्माचा प्रचार करण्यासाठीं त्यांची जीवावर उदार होऊन लढण्याचीही तयारी आहे. खुद्द हिटलर त्यांना अवतारी पुरुष वाटतो, व त्याच्यावर त्यांचा इतका विश्वास आहे कीं जर हिटलरनें आज्ञा केली तर हातांत केवळ काठ्या घेऊन आधुनिक शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज अशा शत्रुपक्षीय सैनेवर हिटलरचे तरुण अनुयायी तुटून पडतील. अशा अन्धश्रद्ध तरुणांच्या जोरावर हिटलर जर्मनीचा सर्वाधिकारी होऊं शकला.

जर्मनींतील परिस्थिति व तरुणांचें पाठबळ यामुळें हिटलरला सर्वाधिकारी होता आलें हें कबूल, पण तरुणांचा घोळका हिटलरच्याभोंवतीं जमला त्याला हिटलरच्या अंगचे गुणच कारण झालें नाहींत कां ? असे हिटलरच्या अंगीं गुण तरी कोणते आहेत ? त्याच्या शिक्षणाकडे पाहिलें ह्मणजे त्याच्यांत अलौकिक बुद्धिमत्ता नसावी, असें वाटतें. त्याच्या प्रतिपक्षीयांवर विश्वास ठेवावयाचा झाला तर ज्या कल्पना, जे विचार, तो व्याख्यानांतून आपले ह्मणून सांगतो ते त्याच्या दुय्यमांनीं सुचविलेले असतात; हिटलरला अशा कल्पनांवर आकर्षक पेहराव चढवून त्या लोकांच्या पुढें चांगल्या तऱ्हेनें मांडतां येतात येवढाच हिटलरचा गुण आहे असें ह्मणावें लागतें. हिटलरच्या अंगांत बुद्धिवैभव, कल्पनावैचित्र्यादि गुण जरी नसले तरी अत्युत्कृष्ट वक्तृत्वाची ईश्वरी देणगी त्याला प्राप्त झाली आहे. अशा वक्त्याच्या भावनाप्रधान वाणीला भावनाप्रधान युवक भुलला तर त्यांत नवल नाहीं. हिटलरला तरुण अनुयायी मिळण्याला आणखीही एक कारण आहे. जर्मन तरुणांना उत्क्रान्तीनें प्रगति होईल असें वाटत नाहीं, प्रगति करण्यासाठीं क्रान्तीचा एकच मार्ग खुला आहे असें त्यांना वाटते. इतर पक्षांच्या कार्यक्रमांत त्यांना क्रान्तीचा वासही येत नाहीं, हिटलरच्या कार्यक्रमांत त्यांना क्रान्तिकिरणें दिसतात. शिवाय सर्वच जर्मन लोक शिस्तीचे भोक्ते आहेत. नाझी पक्षावांचून इतर पक्षांच्या कार्यक्रमांत शिस्तीला स्थान नसल्यामुळें शिस्तप्रिय नाझींकडे तरुण सहजच आकर्षिले जातात.

हिटलर यशस्वी होण्याला गुणापेक्षां परिस्थिति व तरुणांचें पाठबळ ही मुख्य कारणें आहेत असें आपण पाहिलें. आतां मुसोलिनी, स्टॅलीन व हिटलर यांच्यांत

कितपत साम्य आहे ? सर्वाधिकारी होण्याला कांहीं विशिष्ट गुण अंगीं असण्याची आवश्यकता आहे काय? या प्रश्नांचा विचार केला तर त्यांच्यांत बाह्यसादृश्यापेक्षां कांहींही सादृश्य नाहीं व सर्वाधिकारी होण्याला अंगीं कांहीं विशिष्ट गुण असावे लागतात असेंही नाहीं असें दिसून येईल. या तिघांत बाह्यसादृश्य आहे असें वर म्हटलेंच आहे. कारण या तिघांचाही जन्म गरिबींत झाला. मुसोलिनीचा बाप लोहार होता, स्टॅलीन चांभाराचा मुलगा आहे, तर हिटलरचे वडील कस्टम खात्यांत शिपाई होते. तिघांचेंही शिक्षण बेताचेंच झा[illegible] आहे. सत्ता हातीं घेण्यासाठीं तिघांनींही खोटेशाहीचा अविलंब केला. येथें त्यांच[illegible]तील साम्य संपलें. आतां त्यांच्यांतील फरक दाखवावयाचा झाला तर असें म्हणतां येईल कीं मुसोलिनी अत्यंत बुद्धिसंपन्न आहे व त्याच्यांत मुत्सद्दीपणाही दिसून [illegible]तो; पंचवार्षिक योजनेचा जनक स्टॅलीन आहे असें गृहीत धरलें तर त्याचीही बुद्धिम[illegible] प्रतीत होते, पण भविष्यकाळांत आपल्या योजनेमुळें कशी परिस्थिती निर्माण [illegible]ईल तें जाणण्याचा त्याच्यांत पोंच नाहीं; हिटलरमध्यें बुद्धीचें व [illegible]विचारसंपदेचें प्रकर्षानें वास्तव्य नाहीं, तो मुत्सद्दी आहे अगर नाहीं [illegible] अजून जगाला दिसावयाचें आहे. मुसोलिनीनें जर एखादें कार्य [illegible]रावयाचें ठरविलें तर त्याची योजना तो अत्यंत बारीक तपशीलासह अगाऊ करून ठेवील, पण होणें जाणें ईश्वराधीन आहे असें म्हणून हिटलर कार्य करण्यास [illegible]कदम सुरवात करील. पण हिटलरमध्यें मुसोलिनी व स्टॅलीन यांच्यांत नसलेला गुण आहे, तो म्हणजे हिटलर अत्यंत श्रेष्ठ दर्जाचा वक्ता आहे. अस्तु. आपल्याला पहावयाचें आहे तें इतकेंच कीं सर्वाधिकारी होण्याला अमुक एक प्रकारचे गुण अंगीं असावेच लागतात असातला भाग नाहीं.

जर्मनीच्या सद्यःपरिस्थितीवरून आपली नजर साहजिकच पाश्चिमात्य राष्ट्रांच्या परिस्थितीकडे वळते. आज पुष्कळशीं पाश्चिमात्य राष्ट्रें सर्वाधिकाऱ्यांच्या अंमलाखालीं असलेलीं दिसतात. इटली, रशिया यांत सर्वाधिकारी होऊन बरेच दिवस झाले; जर्मनींत हिटलर व ऑस्ट्रियांत डॉलफस यांनीं राज्यशकट मनाला येईल तसा हांकण्यास सुरवात केली आहे व अमेरिकेचे अध्यक्ष फ्रांकलिन रूझ-

व्हेल्ट यांनीं आर्थिक दु:स्थितीची सबब पुढें करून काँग्रेस व सीनेट यांजकडून बरेच जादा अधिकार घेतले आहेत. अशा तऱ्हेनें पुष्कळशा राष्ट्रांवर एकच व्यक्ति अधिकार गाजवूं लागल्यानें लोकशाहीचे गोडवे गाणाऱ्या पाश्चात्य राष्ट्रांना तिचा कंटाळा आला? अगर लोकशाहीमुळें राज्यव्यवस्था नीट राहूं शकत नाहीं असा अनुभव आला? दुसऱ्या प्रकारचा अनुभव आला असल्यास सर्वाधिकाऱ्यापेक्षां राजा असलेला बरा असें त्यांना कां वाटूं नये? सर्वाधिकाऱ्यापेक्षां राजा असण्यांत थोडासा फायदाच नाहीं कां? कारण सर्वाधिकाऱ्याच्या परंपरेंत सातत्य राहूं शकणार नाहीं तें [illegible]परंपरेंत राहूं शकेल, असे विचार मनांत येऊं लागतात. पण अशा तऱ्हेनें [illegible] प्रश्नाकडे पाहण्यापेक्षां परिस्थित्यनुरुप शासनव्यवस्थेंत फरक करणें इष्ट [illegible] व राष्ट्राच्या मनांत असो वा नसो परिस्थिति योग्य तो बदल घडवून आणील [illegible]सें ह्मणणें अधिक सयुक्तिक होईल असें आह्मास वाटतें. असो.

सध्यां हि[illegible]लर अनियंत्रित सत्ताधीश आहे, व त्यानें फॉन् पापन व ह्युगेनबर्ग यांना बाजू[illegible] सारून राष्ट्रनौका हांकण्यास सुरवात केली आहे येवढें खरें. त्याच्या भोंवताल[illegible] परिस्थिति मात्र अत्यंत वाईट आहे. जर्मन राष्ट्रावर जागतिक आर्थिक हलाखी[illegible]ळें अत्यंत वाईट दिवस ओढवले आहेत. गेल्या तीन वर्षांतील जर्मन अंदा[illegible]पत्रकांतील तुटीचा आंकडा दीड अब्ज रुपयांच्या घरांत गेला आहे व युद्ध[illegible]र्ज सोडून दिलें तर जर्मन राइखला सध्यां दहा अब्ज रुपये कर्ज आहे सध्यां बेकारांची संख्या ६० लक्ष असून, योग्य उपाय न योजले तर ती दिवसें दिवस वाढत जाईल. दोस्त राष्ट्रांच्या ताठरपणामुळें जर्मनीला हलाखीचे दिव[illegible] आले, असे दिवस येण्याला ज्यू, सोशालिस्ट व कम्युनिस्ट कारण आहेत अ[illegible] सांगून हिटलर चॅन्सेलर झाला. परराष्ट्रीय राजकारणाची तरवार परजून हिटल[illegible] सत्ताधीश झाला, पण ही सत्ता टिकवून धरण्याला हें शस्त्र उपयोगाचें नाह[illegible] जर्मनीला सुस्थितीचे दिवस हिटलर दाखवूं शकला तरच त्याच्या हातांत सत्त[illegible] राहणें शक्य आहे.

